मीना प्रकाशन

६

# रुतणारे कांटे

लेखकः—नारायण धोंडो उपाध्ये.

[ ' आर्थिक-स्वातंत्र्य, ' ' हें काय ?, ' ' आटपा लौकर, '
' सौभाग्य-लांछन, ' या नाटकांचे व ' अभागिनीची
डायरी, ' ' निखारा, ' ' वातचक्र '
या कादंबऱ्यांचे कर्ते.

प्रस्तावना लेखकः—श्री. मामा वरेरकर.

किंमत—२-८-०

— प्रकाशक —
शेट हिरजी मोहनजी,
शंकरबारी लेन, लोहाणा
सॅनिटरी, ठाकुरद्वार, मुंबई २.

— मुद्रक —
आर. एस. गुप्ते,
मुंबई वैभव प्रेस, सँढहर्स्ट रोड,
गिरगांव, मुंबई ४.

( कव्हरवरील चित्राचा ब्लाक श्री. बा. पा. सामत
यांचे कृपेनें मिळाला आहे. )



कादंबरीचा लेखनकाल ५-३-४० ते २९-३-४०

---

# अर्पणपत्रिका

प्रिय मित्र श्री. कृष्णाजी लक्ष्मण रामदासी, यांसी सप्रेम नमस्कार वि. वि.:—

माझी स्वतःची अपुरी राहिलेली आत्यंतिक इच्छा स्वावलंबनानें पुरी करण्याचा तूं चंग बांधलास म्हणून—आणि या अनुदार वृत्तीच्या स्वार्थपरायण जगाशीं झुंझतांना स्वतःच्या दोन हातांची उणीव तीव्रतेनें (?) भासली, ती भरून काढण्या-स्तव तूं आणखी 'दोन हात' मदतीला घेत आहेस म्हणून—

' तुझ्या आयुष्यांतील सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यायोग्य अशा या शुभप्रसंगीं अत्यानंदानें हें पुस्तक अहेरादाखल सप्रेम अर्पण करीत आहें. स्वीकार व्हावा, कळावें.

१५ मे, १९४०<br>उत्पात गल्ली<br>पंढरपूर.

तुझाच (प्रेमांकित)<br>ना. धों. अुपाध्ये.

श्री

# आशिर्वाद

गेल्या महायुद्धानंतर युरोपिअन वाङ्मयांत जशी वैचारिक क्रान्ति झाली त्याचप्रमाणें कायदेभंगाच्या चळवळीनंतर मराठी कथा-वाङ्मयांतील ठराविकपणा नाहींसा झाला. प्रत्येक कथा-लेखकाच्या मनोभूमिकेवर त्या चळवळीचा आणि त्या चळवळींतील बऱ्यावाईट प्रसंगांचा थोडाफार परिणाम झाला. प्रत्येक लेखकानें अंतर्मुख होऊन लेखनाला प्रारंभ केला.

कथा-वाङ्मय हें केवळ करमणुकीचें साधन आहे असें नाहीं. कथा-वाङ्मय हा समाजाच्या विविध क्षेत्रांत वावरणाऱ्या व्यक्तींच्या जीवनाचा इतिहास आहे. तेव्हां त्या इतिहासांत तत्कालिन समाजाच्या आशा-आकांक्षा प्रतीत झाल्या पाहिजेत—जीवनाचें स्पष्ट प्रतिबिंब उमटलें पाहिजे असा आग्रह धरला तर रास्तच आहे.

कालाप्रमाणें समाजांतील परिस्थिति बदलत जाते आणि त्या परिस्थिती-प्रमाणेंच माणसांच्या मनोभूमिकेंत बदल होत जातो. माणसाच्या जीवनाला परिस्थितीमुळें कलाटणी मिळत असते. आणि त्यामुळेंच विचारक्रान्ति होते. गेल्या पन्नास वर्षांत जें सामाजिक, राजकीय स्थित्यन्तर घडून आलें आहे त्या स्थित्यन्तराच्या अनेकविध छटा समाजांतील व्यक्तींच्या जीवनांवर उमटलेल्या आहेत. या छटांचीच जर कथालेखकानें कलात्मकतेनें वाङ्मयांत गुंफण केली तरच त्याच्या वाङ्मयाला वास्तव स्वरूप प्राप्त होईल. हरिभाऊंनीं ज्या काळीं कथा-वाङ्मय निर्माण केलें त्या काळची सामाजिक परिस्थिति अगदीं वेगळी होती. हरिभाऊंनीं मराठी वाङ्मयांत जें असामान्य कर्तृत्व गाजविलें आहे त्यामुळें मराठी भाषा अस्तित्वांत असेपर्यंत हरिभाऊंच्या वाङ्मयाविषयीं कुणाला अनास्था दाखवितां येणार नाहीं. कारण हरिभाऊंचें वाङ्मय हा तत्कालिन समाजाचा

इतिहास आहे. पण हरिभाऊंच्या कथा–वाङ्मयांतील नायक–नायिकांच्या वळणावर आजच्या वाङ्मयांतून स्वभावचित्रें रेखाटण्याचा नवशिक्या लेखकानें प्रयत्न केला तर तो अप्रासंगिक ठरेल. कारण त्या कालापेक्षां आजचा काल किती तरी बदललेला आहे. तेव्हां या जाणीवेनेंच लेखकांनीं आतां आपल्या वाङ्मयाला वळण लावलें पाहिजे. श्री. उपाध्ये यांच्या प्रस्तुत कादंबरींत आजच्या तरुण-तरुणींच्या जीवनाचा इतिहास आहे ही एकच गोष्ट मला जास्त महत्त्वाची वाटते. अर्थातच इतिहास लिहिणाराच्या दृष्टीप्रमाणेंच इतिहासाचें स्वरूप राहातें ही गोष्ट तितकीच खरी आहे.

मी प्रचारकवाङ्मयाचा भोक्ता आहें. इतकेंच नव्हे तर कोणत्याही कथा–वाङ्मयांत प्रचार असावा असा माझा आग्रह आहे. पण प्रचार असावा याचा अर्थ कलात्मकतेकडे दुर्लक्ष केलें जावें असें मात्र मला वाटत नाहीं. पण दुसरेंही माझें असें म्हणणें आहे, कीं जें कथा–वाङ्मय प्रचाराच्या दृष्टीनें प्रभावी ठरतें तें कलात्मक असतें. कलात्मकतेशिवाय कोणतेंही वाङ्मय प्रभावी ठरणार नाहीं. आणि म्हणूनच नवख्या लेखकांनीं देशी–परदेशी ललितकृतींचीं अनेकवार पारायणें केलीं पाहिजेत. नवोदित लेखकांनीं खूप वाचावें आणि थोडें लिहावें असा नियम केला तरच त्यांच्या वाङ्मयांत जिवंतपणा आणि नाविन्य आढळेल. लेखक होणें विशेषतः कथा–लेखक होणें ही अत्यंत परिश्रमाची कामगिरी आहे. ही कला संपादन करण्यासाठीं शरीर, मन आणि बुद्धि झिजवावी लागते. आणि नंतरच ती कला हस्तगत करतां येते.

श्री. उपाध्ये हे नवोदित लेखक आहेत. कादंबरीलेखनाला आवश्यक असलेले अनेक गुण त्यांच्यांत आहेत. या गुणांचा त्यांना व्यासंगानें विकासही करतां येईल. उत्कृष्ट कादंबरीकार म्हणून कीर्ति मिळवायची असेल तर त्यांनीं अधाशीपणानें देशी–परदेशी वाङ्मय वाचावें अशी माझी त्यांना आग्रहाची सूचना आहे.

**मामा वरेरकर.**

# भाव-निवेदन



माझी कादंबरी ' स्वतंत्र ' आहे अशी बढाई मारणाऱ्या लेखकांपैकीं मी नाहीं. माझ्या कादंबरींत चित्रिलेले कांहीं प्रसंग अन्यत्र कुठें ना कुठें तरी पहावयास सांपडणार नाहींत असा निर्वाळा देऊन मी तोंड लपवूं इच्छित नाहीं, हें जसें खरें; तसेंच कळत-नकळत चित्रिलेले प्रसंग हेतुपुरस्सर उचललेले नाहींत हेंही पण खरें आहे. सुप्रसिद्ध कादंबरीकार श्री. हडप यांनीं आपल्या ' राणी कीं रखेली ' या कादंबरीच्या प्रस्तावनेंत मोठमोठ्या लेखकांच्या कृतीसुद्धां स्वतंत्र नाहींत हें साधार पटवून दिलें असल्याचें प्रस्तुत लेखकाला आठवत आहे. अशा स्थितींत माझ्यासारख्या नवख्या लेखकानें उगाच कां म्हणून बढाई मारावी, अन् हंसें करून घ्यावें ?

सुप्रसिद्ध लेखक श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांनीं माझ्यावर आपल्या लिखाणाची विलक्षण छाप पाडली आहे. त्यांना मी अत्यंत पूज्यभावनेनें गुरु समजतों. त्यांचें लिखाण मी अत्यंत आवडीनें वाचतों, आणि मनन

करतों. साहजिकच, त्यांचे ठायींचे कांहीं कांहीं गुण अत्यल्पांशानें कां होईना पण माझ्या ठायीं बाणले असण्याचा संभव आहे ! त्यांचें प्रमाणमापन मात्र माझे रसिक वाचक आणि पक्षातीत टीकाकार करतीलच ! श्री. माडखोलकरांची आणि माझी प्रत्यक्ष भेट अद्यापि झाली नाहीं, आणि पत्रव्यवहारही मुळींच झाला नाहीं. तथापि त्यांना माझ्या लिखाणाविषयीं कांहीं तरी आत्मीयता वाटत असावी, अशी माझी समजूत आहे. त्यांनीं माझ्या पहिल्या कादंबरीवर 'महाराष्ट्रांतून' जो अभिप्राय प्रसिद्ध केला आहे, तेवढ्यावरून मी हा असा समज करून घेतला आहे.

१९३७ सालीं माझी 'अभागिनीची डायरी' ही कादंबरी प्रसिद्ध झाली. ही माझी पहिलीच कादंबरी असूनही, नवख्या लेखकाच्या वांट्याला जें भाग्य लाभत नाहीं तें मला या कादंबरीमुळें लाभलें आहे. ग्वाल्हेरचे प्राध्यापक श्री. प्र. वा. बापट यांनीं 'मराठी कादंबरी–तंत्र आणि विकास' या नांवाचें एक पुस्तक लिहून प्रसिद्ध केलें आहे. त्या पुस्तकांत त्यांनीं 'अभागिनीची डायरी' या माझ्या पहिल्या कादंबरीसंबंधानें गौरवपर उद्गार काढले आहेत. (पृ० ५८–५९–पाहा.) तसेंच श्री. ना. वि. कुळकर्णी यांची 'माणिक' नांवाची कादंबरी हल्लीं विश्वविद्यालयांत अभ्यासक्रमासाठीं नेमली आहे. त्या 'माणिक' वर 'माणिकच्या रंगछटा,' या नांवाचा छोटासा टीकात्मक प्रबंध कुणी लिहून पुस्तकरूपानें प्रसिद्ध केला आहे. त्या प्रबंधांत माझ्या 'अभागिनीची डायरी' या कादंबरीचा उल्लेख आहे. सदरहू दोन्ही पुस्तकांतले उल्लेख हे माझ्या यशाचे द्योतक असून, माझ्या पहिल्यावहिल्याच कादंबरीवर आले असल्यानें ते मला जास्त अभिमानाचे वाटतात.

तंत्र कशाला म्हणतात हें मला कळत नाहीं. मी एक सामान्य लेखक आहें. लिहिल्याशिवाय राहवत नाहीं म्हणून लिहितों. इतरांच्या लिखाणापेक्षां आपल्या लिखाणांत कांहीं तरी नवीन असावं असा माझा प्रधान हेतु असतो. हा नवीनपणा हेंच मी माझें 'तंत्र' समजतों. एकाच व्यक्तीच्या डायरींतून

एक संपूर्ण कादंबरी लिहून काढायची ही कल्पना मला नवीन वाटली, मीं ती चितारली. त्यानंतर केवळ दोनच पात्रांतून संपूर्ण कादंबरीचा इमला उठवायचा ही कल्पना मला नवीन वाटली, मीं तीही चितारली. केवळ वृत्तपत्रांच्या स्वरूपांत कादंबरी तयार करायची ही कल्पना सर्वस्वीं नवीन वाटली. तीही चितारली. मध्यंतरीं प्रचलित रूढ मार्गावरून रेंगाळावेंसें वाटलें म्हणून तशाही धर्तीनें मी तीन कादंबऱ्या लिहिल्या. त्या या तीन कादंबऱ्यांपैकीं एक कादंबरी आज प्रसिद्ध होत आहे. दुसरी ' अभिसारिका ' लौकरच प्रसिद्ध होईल, आणि तिसरी ' कुंदा ' पंढरपूर येथील ' सुरस ग्रंथमाले ' तर्फे प्रसिद्ध होईल.

' रुतणारे कांटे ' ही एक त्रुटित गोष्ट आहे. प्रस्तुत गोष्टीला मी 'कादंबरी' या सदरांत ढकलूं इच्छित नाहीं. सूत्रबद्धता हा कादंबरीचा जो मुख्य गुण त्याचा अभाव या गोष्टींत आहे, हा दोष मी प्रांजलपणें कबूल करतों. निरनिराळ्या कांट्यांच्या एकत्रित फांट्यानें रोपटें दिसूं शकत नाहीं, तसेंच कांहींसें स्वरूप या ' रुतणाऱ्या कांट्यां'चे आहे. मनुष्याच्या अंतर्यामींच्या भावना कैकदां किती विकोपाला जातात हें दर्शविण्याच्या हेतूनें मी हें पुस्तक लिहिलें आहे. यांत राजकारणाचा जो मीं ओझरता उहापोह केला आहे, तो उपरिनिर्दिष्ट हेतूच्या पूर्ततेसाठीं ! एकाद्या तत्त्वाचा पुरस्कार-प्रचार करण्यासाठीं लिहिलेलें नाहीं. कला ही **प्रचारात्मकच** असली पाहिजे असा माझा अट्टाहास नाहीं. जातां जातां एकाद्या तत्त्वाचा प्रचार **सहजतेनें** साधूं शकत असेल तर तो अमलांत आणावा हा माझा दृष्टिकोन आहे. केवळ प्रचाराकडेच संपूर्ण लक्ष दिल्यास कलेंतील जिवंतपणा नष्ट होईल अशी माझी दृढ समजूत आहे. प्रचाराच्या दृष्टीनें अतीशय प्रभावी असलेल्या मायकोव्स्कीच्या कविता लेनिनला कंटाळवाण्या वाटल्या याचें कारण त्यांतील कला नष्ट झाली होती हेंच होय. अर्थातच ही दृष्टी ठेवून मी ही कादंबरी लिहिण्याचा प्रयत्न केला आहे.

जें जें पाहिलें, रुचलें, पटलें, अनुभविलें आणि बोचलें–रुतलें तेंच उघडपणें व्यक्तविलें आहे. क्वचित् कोठें अतिशयोक्तीचा मालमसाला भरीला पडलाच असेल, तर तो केवळ माझ्या स्वतःच्या त्रस्त आणि व्यग्र मनाच्या रंजकतेसाठींच !

प्रस्तुत पुस्तक मीं अत्यंत घाईनें आणि अल्पावधींत लिहून पुरें केलें असल्यानें सूत्रबद्धतेचा अभाव यांत राहिला आहे हा दोष मी कबूल करीत आहेंच; त्याशिवायही आणखी अनेक दोष राहिले असतील–आहेतही. पण हंसक्षीर न्यायानें रसिक वाचक गुणग्रहण करतील अशी आशा आहे.

प्रस्तुत कादंबरी प्रकाशित होण्यापूर्वी, माझे परम स्नेही श्री. तुकाराम संभाजी लोखंडे यांच्या मदतीचा कृतज्ञतेनें उल्लेख करणें जरूर आहे, तद्वत् श्री. दामोदर सावळाराम यंदे यांनींही प्रकृतीच्या प्रतिकूलतेंतही कादंबरींतल्या विषयासंबंधीं योग्य उहापोह करून मला ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न केला, त्याबद्दल त्यांचे आभार मानणें जरूर आहे. प्रकाशन व्यवसाय हा आजच्या युद्धयमान स्थितींत प्रतिकूल असतांही मजवरील प्रेमानें प्रस्तुत पुस्तकाच्या प्रकाशनाचें काम धाडसानें स्वीकारलें याबद्दल प्रकाशकांचे आभार मानणें जरूर आहे. वेळांत वेळ काढून 'आशीर्वादा' चे शब्द लिहून दिल्या-बद्दल सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. मामा वरेरकर यांचे आभार मानलेच पाहिजेत. श्री. मोडक यांनीं माझेकडून झालेला अनेक प्रकारचा त्रास सोसूनही छपाई-संबंधींची जबाबदारी उत्तम रीतीनें पार पाडली, यावरूनच त्यांचें मजवर असलेलें प्रेम व्यक्त झालें आहे. तेव्हां त्यांच्या या अल्पावधींत लाभलेल्या प्रेमाची परतफेड आभाराच्या शाब्दिक संपत्तीशिवाय दुसऱ्या कशानें करणार ?

'ज्ञानमंदिर' कार्यालय,<br>मुंबई नं. २

रसिकांचा नम्र<br>**ना. धों. उपाध्ये.**



## मला आलेल्या कांहीं

# साहित्यिकांच्या पत्रांतील उतारे



### कै. गणेशशास्त्री फाटक

" आपलें ' सौभाग्य लांछन ' नाटक वाचलें. मला तें फार फार आवडलें. मनोहरच्या आकाशवाणी'तून प्रो. फडके यांनीं एका इंग्लिश नाटकाचें रसग्रहण केलें आहे. मला वाटतें, आपलें ' सौभाग्य लांछन ' नाटक त्याही-पेक्षां जास्त सरस ठरेल. भाषेचें लालित्य, प्रवेशांची आटोपशीर अन् कलात्मक मांडणी, आणि प्रत्येक अंकाचा विशिष्ट ठिकाणींच केलेला चित्तवेधक शेवट या गोष्टी प्रामुख्यानें दिसून आल्या ! तुमच्या या नाटकाच्या कथानकांत आणि मॉमच्या त्या नाटकाच्या कथानकांत कांहींसें साम्य आढळून येतें. मॉमनें स्टेलाचा पती पांगळा दाखविला आहे, तर तुम्ही उमाचा पती क्लीब दाखविला आहे. आतांपर्यंतच्या मराठी नाटकांत कुठेंही क्लीब पात्र आढळून येण्यासारखें नाहीं. त्या दृष्टीनें पाहातां आपला हा पुरुषोत्तम–हें क्लीब पात्र–मराठी नाट्यसृष्टींत अमर राहीलसें वाटतें. ही क्लीब भूमिका करायला कोणी नट तयार होत नाहीं असें आपण पत्रांतून कळविलेंत. तुमचें दुर्दैव आहे तें. स्त्रियांच्या भूमिका घेऊन नाचायला या नटांना लाज वाटत नाहीं आणि क्लीब भूमिका करायला मात्र लाज वाटावी याचें आश्चर्य वाटतें. असो. आपण या नाटकाचें हस्तलिखित प्रो. फडके यांचेकडे पाठवावें. ते उत्तम गुणग्राहक आहेत. परप्रांतीयांचें कौतुक ते करतात, तेव्हां तोच गुण तुमच्यांत आढळून येण्यासारखा असल्यानें ते खात्रीनें तुमचें कौतुक करतील...."

श्री. **पं. मा. कामतकर.** (१८–९–४०)

"... निर्भीडपणानें गुणदोषांची चर्चा करावी अशी जी सूचना आपण केली आहे त्याबद्दल मी आपलें मनःपूर्वक अभिनंदन करतों. इतकी समतोल, समंजसपणाची वृत्ती फार थोडया लेखकांच्या ठिकाणीं मला आढळून आली.

... आपली लेखनशैली अतीशय जोमदार आणि रसानुकूल असल्या-मुळें कोणताही मजकूर वाचनीय वाटला तर त्यांत नवल नाहीं. मूळ कादंबरीची बैठकच भावनाप्रधान, तशांत आपली ओघवती व रसानुकूल लेखनसरणी. मग आपलें लिखाण भावनोत्कट ठरलें तर त्यांत आश्चर्य कसलें ? इतकी लिखाणाच्या बाबतींत गुणाच्या दृष्टीनें विचार करतां आपणांस अनुकूलता असतांना–आपण रा. माडखोलकरांचें नसतें अनुकरण करण्याच्या फंदांत मुळींच पडूं नये. रसरसलेल्या कच्च्या नारिंगाची उपमा किंवा दृष्टान्त म्हणा–आपण सहज टाळूं शकतां."

श्री. **य. गो. जोशी.** (२७–१–४०)

"आपली 'वातचक्र' ही कादंबरी समग्र वाचली. वर्तमानपत्रांतील उताऱ्याच्या रूपानें कादंबरी लिहिण्याचा प्रकार अभिनव खात्रीनें आहे. अर्थात् या विशिष्ट प्रकारानें कादंबरी लिहिल्यामुळें आपलें मी मनःपूर्वक अभिनंदन करतों. मात्र त्यांतील पात्रांचा स्वभावपरिपोष जेव्हढा व्हायला पाहिजे तेवढा झालेला नाहीं हें, मला वाटतें, आपणांसही कबूल करावें लागेल. असें असलें तरी त्यांतील नाविन्यामुळें कादंबरी वाचनीय झाली आहे यांत शंका नाहीं. त्रुटित सनावळ्या देऊन इतिहासांतील घटना सांगाव्यात त्याप्रमाणें या लघुकादंबरीचें स्वरूप आहे. ......"



# रुतणारे कांटे



## १ भावनाप्रकर्ष

तारीखः—७ जून १९३७ सोमवार

सायंकाळीं रोजच्याप्रमाणें टेनिस खेळायला गेलें होतें. टेनिस खेळून झाल्यानंतर मी, विमल, रत्ना साऱ्याजणीं सुहासच्या घरीं गेलों.

आज सुहासनेंच आम्हां साऱ्याजणींना मुद्दाम घरीं नेलं होतं. सुहास म्हणजे माझी जिवलग मैत्रीण. सुहासच्या घरीं गेल्यानंतर आम्हां साऱ्यांच्या गप्पा सुरूं झाल्या.

सुहासला तिच्या नवऱ्यानें टाकलं होतं. सुहास म्हणजे 'टाकलेली बायको', किंवा थोडक्यांत 'परित्यक्ता' होती.

तशी सुहास देखणी आहे. वर्णानें जरा काळीसांवळी असली तरी नाकींडोळीं ठसठशीत, रेखीव अवयव आणि स्वच्छ टापटिपीची राहाणी यांमुळें तिच्यांत एकप्रकारें आकर्षकता निर्माण झाली होती.

सुहासच्या घरची गरीबी आहे. तिच्या आईनें खानावळ घातली आहे. तिला वडील वगैरे जवळचें असें नातेवाईक कोणीच नाहीं. फक्त एक आई नी एक धाकटा भाऊ! तिचा भाऊ–दिनकर–शाळेंत तिसऱ्या ईयत्तेंत आहे. सुहास मॅट्रिकच्या परिक्षेला बसली होती. त्यांत ती उत्तीर्ण झाली म्हणून तिनें आज आम्हां सर्वांना मोठ्या आनंदानें चहासाठीं घरीं आणलें होतें.

चिरपरिचित आणि समवयस्क अशा पांचसहाजणीं एकेठिकाणीं जमल्यानंतर त्या कधींतरीं स्वस्थ राहातील कां? गप्पा–सप्पा या चालायच्याच!

बोलतां बोलतां सुहासच्या वैवाहिक आयुष्यावर बोलणें निघालें नी तो उहापोह इतका कडेलोटाला पोहोंचला कीं, जमलेल्यापैकीं कित्येकींनीं 'लग्नच करावयाचें नाहीं' असा निश्चय केला.—प्रतिज्ञाही घेतली.

अखंड कुमारिका राहावयाचें; अविवाहित आयुष्य घालवायचें हीच ती प्रतिज्ञा.

मीही निश्चय केला—प्रतिज्ञा घेतली.

*          *          *          *

तारीखः—९ जून १९३७ बुधवार

आम्हीं साऱ्या मैत्रिणींनीं मिळून 'महिला मंडळ' स्थापिलें होतें. दर बुधवारीं वादविवादाचा कार्यक्रम ठरवून ठेवलेला होता. कधीं कधीं आम्हीं पुरुषांनाही वादविवादासाठीं बोलावीत असूं व ठरलेल्या विषयावर साधक बाधक चर्चा होईल अशी खबरदारी घेत असूं.

आम्हीं आज वादविवादासाठीं 'सहवासोत्तर विवाह ~~कीं विवाहोत्तर सहवास~~' हा विषय निवडला होता. परिचित समवयस्क तरुणांनाही चर्चेसाठीं आमंत्रण दिलें होतें. आमच्या मंडळाचा नियमच हा कीं, सभेला अध्यक्ष नेमावयाचा नाहीं. मंडळाच्या सेक्रेटरीणबाईनें जमलेल्यांना पुन्हां एकदां विषयाचें नांव व त्याबद्दलची थोडीशी माहिती सांगायची आणि वक्त्यांना आपलीं मतें प्रतिपादण्यास आव्हान द्यायचें.

बहुतेक सर्वांनीं सहवासोत्तर विवाहाची इष्टता पटवून दिली, पण असेही कांहीं निघाले, कीं त्यांनीं विवाहोत्तर सहवासच इष्ट असें अट्टाहासानें प्रतिपादण्यास कमी केलें नाहीं.

शेवटीं चर्चेचा रागरंग बदलला, श्लील-अश्लीलतेची मर्यादा संपली आणि 'आपलेंच खरें' करून दाखविण्यासाठीं जो तो तोंडाला येईल तें बहकूं लागला.

मीं चर्चेंत भाग घेतलेला नव्हताच; पण एकंदर वातावरण चिघळलेलें पाहून तिथें बसावं असं वाटेना.

मी रत्नाला बरोबर घेतलं नी घरीं आलें.

" सभेला अध्यक्ष नसला म्हणजे असा गोंधळ होतो हें मी येतांना रत्नाजवळ बोलूनही दाखवलं.

झाल्या गोष्टीवर आम्हीं घरीं आल्यानंतर बराच वेळ बोलत होतों.

परवां सुहासच्या घरीं रत्नानेंही लग्न न करण्याची प्रतिज्ञा घेतली होती.

पण आज, इथं माझ्यासमोर बोलतांना ती ' लग्नाशिवाय राहातां येणं अशक्य आहे ' असं म्हणूं लागली.

तरुण स्त्री–पुरुषांच्या सहवासाला सततपणा वाढल्यानंतर त्यांच्या यौवनोन्मादोत्पत्तलालसेनें एकमेकांकडे ओढ घेणें व त्यानंतर प्रसंगीं, त्या यौवनोन्मादोत्पत्त-अतृप्त लालसेनें एकांत सान्निध्यांत आपल्या अतृप्ततेची असह्य आग शमवून घेणें हें निसर्गप्राप्त आहे, असें रत्नाचें म्हणणें होतें.

रत्ना स्वानुभवानें बोलत होती.

विभाकरावर–माझा थोरला भाऊ–तिचें प्रेम बसलें आहे आणि विभाकराचेंहि तिच्यावर प्रेम असल्याचें रत्नाकडूनच मला कळलें.

मी अट्टाहासानें ' लग्नच करणार नाहीं ' असं म्हणत होतें पण अखेरीस रत्नानें माझ्या अंतःसागराच्या वीचि हेलावून सोडल्याच !

"एकदां अंतःकरणांत प्रेमाचें बीं रुजल्यानंतर त्याची वाढ आपोआपच होते. त्याला खुरटवून टाकणें सहसा अशक्यप्राय असते. तूं आतां नाहीं म्हणशील, पण तुझ्या अंतःकरणाचा ओढा वसंता-कडे आहे हें मला माहीत आहे."

खरं आहे तिचं म्हणणं !

बोलण्याचा ओघ बदलावा या हेतूनें मी झटकन् उठलें नं
" चहा करायला सांगून येतें हं आईला; बैस थोडावेळ." असं
म्हणून जाऊं लागलें, तितक्यांत—

" आईला ? आणि स्वयंपाकीण कुठें गेली ?" रत्नानें विचारलं

" काढून टाकली. " मी उत्तर दिलं.

" कां बरं ? "

" सुखानें खायला नको वाटलं. वाकड्या रस्त्यानें गेलं, कीं असं व्हायचंच ! अनाथ विधवा, लहान वय म्हणून आमच्या बाबांनीं तिला आश्रय दिला, पण तिनें आपले गुण पाघळलेच ! सध्यां गेली असेल पंढरपुरच्या ऑर्फनीजमध्यें. आमच्या बाबांनींच पाठविलं आहे तिला तिकडे ! "

" किती तिरस्कारानें बोलते आहेस तूं तिच्याबद्दल ? एवढ्या-साठीं कां तिला दोष देतां तुम्ही ? "

" दोष कां देतां ? बरीच शाहाणी आहेस कीं ? अग तिला जर गंगाजलाप्रमाणं राहातां येत नव्हतं, तर सरळ पुनर्विवाह करायचा होता कुण्या तरुणाशीं ! "

" कोण तरुण आपणहोऊन पुनर्विवाहाला तयार होतो ? तरणी-ताठी पोर—सळसळत्या भावना स्वस्थ राहूं देत नाहींत अन् समाजाला स्पष्टपणें अंतरींच्या जळत्या भावना बोलून दाखवतां येत नाहींत, अशा दुहेरी पकडींत सांपडलेल्या तिच्या हातून हें कृत्य घडून आलं म्हणून कां तिला दोष द्यायचा ? "

" पुरे बाई. तो विषयच नको ! " मी कंटाळल्यासारखा चेहरा करून म्हणालें.

आम्हीं चहा पीत होतों, तितक्यांत बाबा आले. आणि रत्ना घरीं गेल्यानंतर त्यांनीं मला हलकेंच 'दादासाहेबांचा मुलगा—वसंता—तुला पसंत आहे कां ? त्याची निवड करतो आहे मी तुझ्यासाठीं ? ' असें विचारलें.

* * * *

तारीखः—१० जून १९३७ गुरुवार

माझ्या दोन मनांचा आपापसांत लढा चालला होता. एक मन म्हणत होतं—' तूं लग्न न करण्याचा निश्चय केला आहेस ना ? ढळूं नकोस तूं आपल्या निश्चयापासून !

दुसरं मन म्हणत होतं—' पण वसंत—वसंत—त्याच्यावर तुझं प्रेम बसलं आहे. आणि बाबांनींही त्याची निवड केली आहे, मग ? '

' असेल प्रेम त्याच्यावर ! म्हणून काय झालं ? छे, नाहीं लग्न करायचं ! वासनेच्या आहारीं जातेस ? धिःकार असो तुला नी त्या तुझ्या स्वाभिमानशून्य स्त्रीत्वाला. ' पहिलं मन मला डिवचीत होतं.

अखेर पहिल्या मनाचाच विजय झाला.

* * * *

तारीखः—१२ जून १९३७ शनिवार

दुपारीं रत्ना आली होती.

विभाकरही घरीं होताच.

दोन अडीचचा सुमार होता.

मी खोलींत आहे हें रत्नाला माहीत नव्हतं, असं वाटतं. ती आली ती सरळ विभाकराकडे गेली, आणि लागलीच थोड्यावेळांत विभाकरासह बाहेर पडली.

आज शनिवार; सर्वत्र सिनेमांचे जादा खेळ !

विभाकर आणि रत्ना आज सिनेमाला निघाले असावेत असं मला त्यांच्याच बोलण्यावरून समजलं.

विभाकर–रत्ना— ?

माझ्या साऱ्या सुप्तशक्ती जागृत झाल्या ! क्षणकाल मी माझा 'लग्न न करण्याचा' निश्चय विसरून गेलें. माझ्या मनश्चक्षूंपुढें वसंत दिसूं लागला, आणि आम्ही दोघे जवळ जवळ उभे आहोंत असा मला भास झाला. त्या भासावस्थेंत माझं सारं शरीर नखशिखांत ओठांनीं चुंबिलं जात आहे असं मला वाटलं. पण तो भास ! भासावस्था ओसरली अन् प्रत्यक्ष स्थितीची जाणीव झाली. माझ्या निश्चयाची मला स्मृति झाली.

'मना, बहकूं नकोस ! पुन्हां असा विचार करूं नकोस. तुला लग्न न करतां राहायचं आहे. नीट लक्षांत ठेव !' मी मनाला बजावलं.

* * * *

तारीखः–१५ जून १९३७ मंगळवार

मी टेनिस खेळायला चाललें होतें. तितक्यांत वसंत आला. त्याला पाहिल्याबरोबर प्रथमच क्षणीं माझ्या चेहऱ्यावर स्मित झळकलं. पण लागलीच, दुसऱ्याच क्षणाला मला मझ्या निश्चयाची

आठवण झाली. वसंतचा सहवास वाढायला लागेल, तर निश्चयाला मूठमाती द्यावी लागेल याची खात्री पटली. अन् म्हणूनच शक्य तों त्याच्यापासून दूरच राहायचें मी ठरविलें.

वसंताचं माझ्यावर प्रेम होतं. आणि — ?

मी प्रतिज्ञा करण्यापूर्वी, माझ्या मनाचा धागान् धागा त्यानें पिंजून पाहिला होता. मी प्रत्यक्ष जरी बोलून दाखवलं नसलं तरी माझं मन त्यानं जाणलं होतं, पण आतां—

आतां मला माझा निश्चय डिवचीत होता. स्वाभिमान वेडावीत होता.

मी त्याच्याशीं कांहींएक न बोलतां झटकन् निघून गेलें. त्याला काय वाटेल याची मी पर्वाच केली नाहीं.

*          *          *          *

तारीखः—१८ जून १९३७ शुक्रवार

लिमयांची वत्सला ! माझ्याबरोबरच तिनेंही लग्न न करून घेण्याची प्रतिज्ञा घेतली होती. आज तर तिनें लग्न करून घेतल्याची बातमी मी ऐकली. हें असं कां व्हावं ? विचार करून करून मस्तक मात्र बधीर झालं ! हिला लग्नाशिवाय जर राहतां येत नव्हतं, तर हिनें प्रतिज्ञा तरी कां केली ? मला वाटतं, जगांत वावरतांना शक्याशक्यतेचा विचार करण्यापेक्षां, तोंडाला येईल तें, अन् चारचौघं बोलतील तें आपणही झोंकून द्यायचं असंच मनुष्य करीत असतो.

दुपारीं आई कुणाजवळसं म्हणाली, ‘ ती लिमयांची वत्सला, माहीत आहे ना ! फार नाचली लग्न करायचं नाहीं म्हणून, पण

घेतलंन् ना लग्न करून ! तोंडाची वाफ दवडायला काय जातंय् ! पण कृतीनं झालं पाहिजे ते सारं ! अहो, लग्नाआधीं तिला दोन महिने गेले होते म्हणे; खरं खोटं देव जाणे ! माझ्या कानावर तसं आलं बाई ! '

खरं असेल कां हें आईचं म्हणणं ? वत्सलेला खरंच कां दोन महिने गेले होते ?

वासना ! वासना !! वासना !!!

वासना ! खरंच, त्या इतक्या प्रबल आहेत कीं, त्यांची तीव्रता कमकुवत माणसाला असह्य होत असली पाहिजे ! त्याशिवाय तो वासनेच्या आहारीं जाणंच शक्य नाहीं ! मनाला आणि शरिरालाही पूर्ण बेभान करण्याचं सामर्थ्य वासनेच्या पोटांत खात्रीनें आहे. या वासनेपासून दूर राहा, असें सारींजणं सांगतात. पण सांगणारांनाही आपल्या वासना दडपतां आल्या नाहींत,—येत नाहींत. मग ऐक-णाराला तरी तें कसं शक्य होईल ?

दुपारीं चार साडेचाराच्या सुमारास वसंत आला होता. बसला थोडावेळ आणि नंतर गेलाही. फार तर अर्धाएक तास होता तो. पण तो तेवढाच वेळ मला किती असह्य झाला. माझ्या मनाला त्याचं तें तेवढ्यावेळेचं सान्निध्य असंच अक्षय टिकून रहावं असं वाटलं, तर दुसऱ्या क्षणीं मला माझ्या निश्चयाची स्मृति झाली. मनाच्या कमकुवतपणाला मी मनांतल्या मनांत लाख शिव्या दिल्या. वासनेच्या आहारीं जाणाऱ्या मनाची तुच्छता केली. अन् त्याचक्षणीं हा वसंत येथून उठून लौकर निघून जाईल तर बरं होईल, असं वाटायला लागलं.

सकाळीं स्नानाला जातांना गडबडींत विभानं माझ्याजवळ आपलं रिस्टवॉच दिलं होतं, तें अद्याप माझ्याच हातांत होतं. परत घ्यायचं तो विसरला होता. साहजिकच मी माझ्या मनगटांत तें बांधलं.

वसंत आलेला पाहून आईनं चहा केला. मी चहाचा कप वसंतापुढें ठेवला, त्यावेळीं दिसलं त्याला माझ्या मनगटांतलं घड्याळ ! त्यानं झटकन् माझं मनगट धरलं, अन् 'केव्हां ग घेतलंस हे घड्याळ ?' असं हंसत हंसत विचारलं. पण हात कांहीं सोडला नाहीं लौकर !

आणि मलाही पण हात सोडवून घ्यावा असं वाटलं नाहींच ! त्याच्या उष्ण तळव्याचा सुखद स्पर्श माझ्या मनाला पुलकित करीत होता. वृत्ती धुंद झाल्या होत्या अन् साऱ्या शरीरावर कांटे उभारले होते.

मी माझं मन मारूं पाहाते आहे. मनांतून मला वसंत हवा आहे. त्याचं सान्निध्य मला तल्लीन करून सोडतं याची जाणीव माझ्या मनाला झाली आहे. मादक गंध-सुगंधाचा हव्यास वसंताच्या सहवासांत सांठला आहे अशी खात्री झाली, पण माझी प्रतिज्ञा पुन्हां पुन्हां बजावून मला डिवचीत होती, कीं 'निमा, काय हें ? तूं बोललीस काय, नी आतां हें करते आहेस काय ?'—अन् लागलीच मी बाजूला होई.

बाजूला झालें, कीं प्रफुल्ल उद्यानांतून रखरखीत वाळवंटांत जाऊन पडल्यासारखं वाटतं. तळघरांतल्या थंडगार ठिकाणांतून--विशेषतः

खिडक्यांना वाळ्यांचे पडदे लावले आहेत, त्यावर गुलाबपाण्याचा शिडकाव केला आहे, समोर खुज्यातलं वाळ्याची जुडी टाकलेलं गार पाणी आहे–अशा थंडगार सुखद वातावरणांतून बाहेरच्या रखरखीत उन्हांत आल्यासारखं वाटतं.

वसंत ! वसंत ! !

होय, मला वसंत हवा आहे.—? ?

पण मग माझी प्रतिज्ञा ?

प्रतिज्ञा ? प्रतिज्ञापूर्ती ?

आरशांतलं प्रतिबिंब आपण समोर आहोंत तोंपर्यंतच टिकतं, समोरून निघून गेलं, की—? ?

आरशांतलं प्रतिबिंब आणि मनांतली प्रतिज्ञा !

प्रतिबिंब–प्रतिज्ञा ! !

* * * *

तारीखः–१९ जून १९३७ शनिवार.

बहुतेक शनिवारींच सिनेमा बदलला जातो अन् नवी सीरीयल सुरूं होते. आजही सिनेमा बदलला होता. त्या जागीं ‘टारझन’ हा इंग्लिश सिनेमा लागला होता. पहिलाच खेळ, शिवाय शनिवार असल्यामुळें दुपारीं जादा खेळ होता. मी तो खेळ पाहाण्यासाठीं गेलें होतें.

टारझनचीं अचाट अन् धाडसी कृत्यें मनाला रंजवितात हें खरं, पण माझ्या मनाला जर कुठल्या एका गोष्टीची चुटपूट लागली

असल, तर त्या टारझनच्या मनांत उद्भवलेल्या प्रीतीची! ज्याचा सारा जन्म अरण्यांतल्या श्वापदांच्या सहवासांत गेला, त्या टारझनला तरुणीच्या सहवासाचा हव्यास वाटावा याच मानवी स्वभावधर्माची परिस्फुटता मोठ्या कौशल्यानें कथालेखकानें या बोलपटांत केलेली दिसून आली मला!

स्त्री–पुरुषांचा सहवास! खरंच, तो इतका मादक अन् आकर्षक आहे कां?

गुळाच्या ढेपीला चिकटलेल्या डोंगळ्यासारखाच हा स्त्री–पुरुषांचा सहवास आहे कां?

मला पाहवेना पुढें तो सिनेमा.

गुहेंत ती तरुणी सांपडते, तिच्यावर दोन सिंह झडप टाकायला येतात, पण तितक्यांत या लतेवरून त्या लतेवर असा उड्या मारीत मारीत टारझन येतो, अन् त्या दोन्ही सिंहाशीं झटापट करून त्यांना चीत करून आपल्या प्रियेला संकटमुक्त करतो. नंतर ती त्याच्या जखमा धुते–बांधते–आणि मग–?

बस! एवढ्यावरच पाहून निघून आलें मी! पुढें पहावेना मला.

काय अजब धाडसाची झुंज ती! सिंहाशीं झुंज! कशासाठीं? तर प्रियेला सोडविण्यासाठीं.

त्यानंतर त्यांचं तें सान्निध्य!

साऱ्या विश्वांतली ऋजुता, चारुता, अन् मधुरता त्या त्यांच्या सान्निध्यांत एकवटली आहे असं मला वाटलं, अन् आपल्या वांट्याला

हें अनुपमेय सुख, सान्निध्यांतील ऋजुता, चारुता अन् मधुरता कशी नी कधीं येणार अशी चुटपुट लागली. मन अस्वस्थ झालं अन् त्या चुटपुटीची तीव्रता इतकी वाढली , कीं पुढें तिथें बसावं असंसुद्धां वाटेना—तें त्याचं मीलन पाहायला नको असं वाटायला लागलं. त्यांना तें मीलन मधुर होतं, पण इकडे माझं मन जळत होतं.

वसंत—माझा वसंत ? ? ?

पण छे ! मन—बेफाम बेलगाम सुटलेला वारू ! खड्डा पाहात नाहीं, कीं कांट्यांचं अंथरूण पाहात नाहीं. त्या वारूला एकच माहीत असतं कीं, धावायचं, बेफाम धावायचं—चौखूर उधळायचं. मग, पाठीवरचा मालक पडो वा कांहींही होवो.

तोंडाला फेंस येईल, साऱ्या शिरा न् शिरा तणतील तेव्हांच तो थांबणार ! वाटेंतल्या कांट्याकुट्यांची अन् खांचखळग्याची त्याला पर्वाच नसते. तो एकप्रकारच्या धुंदींत पळत असतो. धुंद ! होय धुंदच ती.

* * * *

तारीखः–२७ जून १९३७ रविवार

दुपारीं रत्ना आली होती.

रत्ना अन् विभाकर सिनेमाला गेले !

रत्ना विभाकर–प्रिया प्रेयसी.

मी अन् वसंत–प्रिया प्रेयसी–?

छे, असह्य झालं आतां.

पुरे करतें आतां हा जीवघेणी लंपडाव.

मग ? जाणार कां तूं वसंताकडे ?

हो. जाणार !

आणि तुझा स्वाभिमान ? तुझा निश्चय ? ती तुझी प्रतिज्ञा ? या साऱ्यांना मूठमाती कां देणार तूं ? असंयमी !

पण मग मी करूं तरी काय ?

माझा एक पाय प्रीतीच्या रज्जूनीं बांधला आहे, तर दुसरा पाय प्रतिज्ञेच्या रस्सीनें जखडला गेला आहे. आतां ही ओढाताण चालायची तरी कोठपर्यंत ?

प्रीति — प्रतिज्ञा— ? ? ?

प्रीतीची मधुर प्रखरता—प्रतिज्ञेची तीव्रता ! ! !

प्रतिज्ञेच्या प्रखर वन्हींत प्रीतीच्या प्रखरतेला जाळलंच पाहिजे.

पोटांत प्रतिज्ञा मुरली आहे. हृदयांत प्रीतीनें ठाणें दिलें आहे.

पोटांतल्या प्रतिज्ञेचा वन्ही पेटला आहे, हृदयांतल्या प्रीतीला जाळतो आहे.

आग—आग—असह्य झाली आहे ही आग !

कशी शमायची ही आग ?

प्रतिज्ञेला मूठमाती द्यायची, वसंताचें सान्निध्य वाढवायचें अन् वसंताच्या सान्निध्यांत ही पेटलेली आग शमवायची !

* * * *

तारीखः—२२ जून १९३७ मंगळवार

" भारतंचेक्षुदंडंच सिंधुं इंदुंच वर्णय
पाद्मेकं प्रदास्यामि ' प्रतिपर्वरसोद्य :' ॥ "

भारत, इक्षुदंड, सिंधु आणि इंदु—आणखी एक शब्द कमी पडला यांत. कवीच्या लक्षांत आला नसावा तो.

भारताच्या प्रत्येक पर्वांत वाढती गोडी, उसाच्या प्रत्येक पेरांत वाढती गोडी, प्रत्येक तिथीस सिंधूस वाढती भरती अन् प्रत्येक तिथीस इंदूस वाढते तेज, तद्वतच प्रीती ही सुद्धां प्रत्येक क्षणीं वाढते-द्विगुणित होते. मग, प्रीति हा एकच शब्द यांत कमी आहे.

प्रीती—वाढती प्रीति– ! ! !

* * * *

तारीखः—२७ जून १९३७ रविवार

कॅन्सरचा रोग कधीं हटला आहे कां ?

डॉक्टर ऑपरेशन करतो—तो कृमि तिथून जातो—दुसरीकडे कुठेंतरी येतो आणि शरीर पोखरूं लागतो. डॉक्टरला कळतं तें. तरीपण तो पुन्हां पुन्हां ऑपरेशन करीतच असतो—तसंच माझं आणि माझ्या मनीं रुजलेल्या प्रीतीचं झालं आहे.

* * * *

तारीखः—२८ जून १९३७ सोमवार

सायंकाळीं फिरायला गेलें होतें.

सहस्ररश्मी क्षितिजावर उभा राहून हंसत होता. तो आपल्या

प्रियेची–पृथ्वीची–आपल्या लांब लांब हातांनीं घातलेली मिठी ढिली करीत होता.

मी पद्मावतीच्या कठड्यावर बसलें होतें. पाण्यांत पाय सोडले होते. अन् एकाग्रपणें पाण्याच्या पृष्ठभागावर पहात होतें.

हात दीड हात अंतरावर एक कमळ दिसत होतं. पांढरा शुभ्र बगळा त्या कमळाजवळ आला, त्याच्यामागून डुलत डुलत मादी आली. त्या कमळाच्या पाकळ्यांखालीं तो बगळा होता. मादीला पाहून तो तेथून बाजूला झाला. ती मादी त्याठिकाणीं जाऊन उभी राहिली.

पक्ष्यांतसुद्धां दाक्षिण्यबुद्धी आहे तर !

हळूं हळूं आकाशांत ढग जमून आले. मेघांचा गडगडाट झाला. तो बगळा अन् ती मादी त्याच ठिकाणीं होतीं.

मी येतांना छत्री वगैरे कांहींच आणली नव्हती. पावसाचं तर स्पष्ट चिन्ह दिसत होतं. मी भानावर आलें, अन् पाऊस येण्यापूर्वींच घरीं जाऊन पोहोंचावं ह्या हेतूनें लगबगीनें उठलें.

मागे वसंत उभा होता.

“काय पाहात होतीस इतक्या एकाग्रपणें निमा ?” वसंतानें विचारलं.

मी उठतांना त्याच्या छातीचा स्पर्श माझ्या खांद्याला झाला अन् त्या स्पर्शानं–नव्हे, त्या धक्यानं मी ओशाळलें. मन आहाळलं.

पण दुसऱ्याच क्षणीं मनांत प्रमाथी लहरी तरंगूं लागल्या.

तिकडे क्षितिजावरच्या भास्करानें पृथ्वीचा निरोप घेतला होता. मेघांच्या व्याप्तीनें दिशा काळयाकुट्ट झाल्या होत्या आणि पद्मावतीचं पाणी मोहक पण काळंभोर दिसत होतं. समोरच्या कमळाखालच्या त्या जोडीनें कूजन करण्यास सुरवात केली होती. त्यांचा तो कूजनरव कर्णमधुर होता.

वसंतानें विचारलेल्या प्रश्नाचं उत्तर म्हणूनच कीं काय, मी त्या जोडीकडं पाहिलं. त्याचंही लक्ष त्याकडे होतंच! त्यानं माझा हात धरला.

तिकडे त्या बगळयांनीं आपल्या चोंची एकमेकांच्या चोंचींत घातल्या. बगळयानें आपल्या मागील बाजूचा–शेपटाचा–पसारा फडफडाविला. बगळीनें, मान उंच केली. एक चित्कार सोडला अन् एक पाय वर उचलून, लागलीच त्याच क्षणीं चोंच पाण्यांत मारून एक कसलासा कृमि बाहेर काढला. त्यांतला निम्मा भाग बगळयाच्या चोंचीजवळ नेला, त्यानें आपल्या चोंचीनें तो घेतला आणि पुन्हां दोघांनींही कूजन करण्यास सुरवात केली.

मी त्यांच्या कृतीकडे टक लावून पहात होतें. माझ्या नेत्रांत भुकेली उत्सुकता तरळत होती.

वसंतानें माझा हात धरला होता. त्यानें माझा पंजा कांहींसा दाबला अन् तो माझा तळवा वर उचलून आपल्या छातीशीं भिडवला.

माझ्या सर्वांगावर कांटे उभे राहिले. गुलाबांच्या फुलांच्या ढिगांत–त्या मनोहारी मादक गंधसुगंधांत–जणुं बुडून गेल्यासारखं वाटलं. मनांत हर्षोत्फुल्ल उर्मि उसळल्या. पौर्णिमेच्या धवलिमेंत

सागराच्या वाढत्या सळसळणाऱ्या वीचिप्रमाणें माझ्या हृदयसागरांत, वसंताच्या निकटच्या सान्निध्यानें प्रणयाच्या वाढत्या वीचि सळसळूं लागल्या. मीं कांहींशीं लाजलें. माझी दृष्टी सहजपणेंच अवनत झाली. मी माझ्या उजव्या पायाचा अंगठा जमिनीच्या पृष्ठावर घासूं लागलें.

आम्ही पाण्याजवळच उभे होतों. माझी दृष्टी खालीं होती. सहाजिकच पाण्याच्या पृष्ठावर ती फिरली. त्या ठिकाणीं आमचं प्रतिबिंब उमटलं होतं. वसंताच्या अंगांतला पांढरा शुभ्र, उघड्या गळयाचा शर्ट आणि त्यावरील काळाभोर कोट त्या चकाकणाऱ्या शांत निळसर पाण्यांत अगदीं स्पष्ट दिसत होता. त्यांच्या शर्टच्या, पुढील खालच्या टोंकाला, माझ्या खांद्यावरून सुटलेल्या पातळाच्या पदराची किनार भिडली होती. जणूं, सप्तपदीच्या वेळीं उपरण्याला मारलेल्या पाताळाच्या गांठीप्रमाणेंच, तें शर्टच्या टोंकाचें व माझ्या पातळाच्या पदराच्या किनारीचें संमीलन, भासमान होत होतें ! माझ्या पातळाचा रंग फिकट निळसर होता. त्यावर उभ्या जरीच्या काड्या विणल्या होत्या. अंगांत शुभ्र रेशमी ब्लाऊज होता. त्यावर लॉकेट झळकत होतं. डोक्यावरचे काळेभोर केस, मागील बुचड्यावर दोनच, पण विशेष शोभिवंत दिसतील अशीं सपर्ण गुलाबाचीं फुलें-हें सारं—त्या पद्मावतीच्या पाण्यांतल्या प्रतिबिंबांत दिसत होतं.

वसंताच्या छातीशीं भिडलेला माझा उजवा हात अद्यापि तसाच होता.

पावसाचे थेंब पडूं लागले होते.

त्या शांत पाण्यावर पावसाच्या थेंबानें तरंग उठूं लागले. त्या उठणाऱ्या तरंगामुळें पाण्यांतल्या प्रतिबिंबाचें स्वरूप—एखाद्या मोठ्या बिलोरी आरशाच्या फुटलेल्या सहस्रावधी तुकड्यांप्रमाणें छिन्नविच्छिन्न दिसूं लागलें.

वाढत्या नखाच्या टोंकानें, शरिराच्या फक्त वरच्या कातडीचा चिमटा जोरानें घ्यावा म्हणजे जशी वेदना होते; तशीच, किंबहुना त्याहीपेक्षां जास्त वेदना त्या छिन्नविच्छिन्न झालेल्या आमच्या प्रतिबिंबाकडे पाहून माझ्या मनाला झाली.

वसंतानें आपला डावा हात माझ्या खांद्यावर ठेवला अन् किंचित् माझा खांदा हलवून त्यानें एक मोहक स्मित केलं.

अगदीं बारीक, पण भारीं किमतीचीं टपोरीं पाणीदार मोतीं सौम्य उजेडांत चमकावींत त्याप्रमाणें त्याच्या लालसर जिवणींत दडून राहिलेल्या त्या शुभ्र टोंकदार दातांची चमक त्या त्याच्या स्मितामुळें माझ्या नजरेंत—मनश्चक्षूंतही—भरली.

माझ्या खांद्याला झालेल्या त्याच्या हाताच्या स्पर्शानें एक विलक्षण अननुभूत चमक माझ्या सर्वांगांतून चमकली अन् मी बेभान झालें. त्या बेभान स्थितींत मी आणखी थोडीशी पुढें सरकलें.

माझ्या उजव्या खांद्यावरचा वसंताचा हात मानेवर सरकला, अन् त्यायोगें माझ्या मानेभोंवतीं किंचित् अर्धवट स्वरूपांत त्याच्या हाताचा विळखा बसला. त्यानें माझा हात हातांत घेतला होता, तो सोडला अन् माझ्या हनुवटीला लावला—

माझ्या मानेवर सरकलेल्या त्याच्या हातानें माझ्या खांद्यावरचा पदर सरकला, अन् तो उजव्या खांद्यावरून डाव्या खांद्यावर, पुरुषानें आपल्या खांद्यावर सोडलेल्या धोतराच्या सोग्याप्रमाणें अव्यवस्थित अन् विस्कळित झाला. माझा उन्नत उरोभाग स्पष्ट दिसूं लागला—याची जाणीव झाली माझ्या मनाला अन् तत्क्षणीं मी बाजूला झालें. मी माझा पदर सावरून घेतला.

त्याचक्षणीं, मला माझ्या निश्चयाची—प्रतिज्ञेची—स्मृति झाली. शरीर थरारलं आणि—आणि—

त्या निश्चयाची तीव्रता इतकी वाढली, कीं झटकन् मी माझं पाऊल त्याचक्षणीं उचललं, भरभर पायऱ्या चढून वर आलें अन् रस्ता गांठला.

रस्त्यानें चालतांना माझ्या मनांत तें पाण्यासन्निधचं दृश्य घोळत होतं, तद्वतच ती माझी प्रतिज्ञाही थैमान घालीत होती.

फिरायला म्हणून गेलें, पद्मावतीच्या टेकडीवरून पायऱ्या उतरून पाण्याजवळ जाऊन बसलें. तो—रम्य—संध्याकाळ, आकाशांतील मेघांची व्याप्ती, बगळ्यांचें कूजन, पाण्यांतील कमळांची मोहकता—सारंच वातावरण उन्मादी अन् मन व शरीर यांना धुंद करण्या-योग्य सामर्थ्यवान् असं होतं.

तशांत, वसंत अकस्मिक आलेला. त्याचं अकस्मिकपणें लाभलेलं अल्पकाळचं सान्निध्य. सहाजिकच माझ्या साऱ्या वृत्ती बेहोष अन् धुंद झाल्या. त्या बेहोष अन् धुंद अवस्थेंतला तो अतिरेक—भलता-सलता नव्हे, फक्त माझ्या मनीं ठरलेल्या विशिष्ट मर्यादेबाहेरचा—

तड फुटली माझ्या मनाच्या कांचेची !

माझा पदर सरकला नसता, तर तो प्रसंग कुठल्या थरापर्यंत पोहोंचला असता न कळे; पदरानें बहार केली, निश्चयाची स्मृति झाली.

घरीं आलें. घरीं सुहास बसली होती. माझी भांबावलेली वृत्ती पाहून तिनें ' काय ग, काय झालं ? ' विचारलं. मी उत्तर न देतां माझ्या खोलींत गेलें. दार लावून घेतलं अन् झुलत्या आरामखुर्चीवर अंग टाकून दिलं.

* * * *

तारीखः—४ जुलै १९३७ रविवार

सकाळीं सुहासच्या घरीं गेलें होतें.

सुहासच्या आई भाजी निवडीत होत्या.

खानावळीची भाजी ! भाराभर असायचीच. खानावळीचं काम म्हणजे अती मेहनतीचं. सकाळीं भाजी आणणं, ती निवडणं अथवा चिरणं, नंतर स्वयंपाक, येणाऱ्यांचीं जेवणं-हा सारा व्याप आटोपतो न आटोपतो तोंच पुन्हां संध्याकाळच्या स्वयंपाकाची तयारी ! बरं, इतकंही करून प्राप्ती म्हणावी तर फार कमी ! जेमतेम तो डोलारा चालवायला उपयोगी पडेल इतकीच प्राप्ती. आगाऊ पैसे देऊन जेवणारे फार थोडे. बहुतेकांचा भर उधारीवर ! बिलं फुगवतात आणि नंतर सरळ खाका वर करून मोकळे होतात. पैसे बुडविणाऱ्यांपैकीं कांहीं जण मुद्दाम बुडवतात, तर कांहींच्या अंगांत सामर्थ्य नसतं म्हणून त्यांचे पैसे बुडतात. एकूण कांहींही असो, भुर्दंड भरावा लागतो खानावळीच्या मालकाला.

सुहासची आई जरी शिकलेली नव्हती, तरी व्यवहारांत ती जरा हुशार अन् दक्ष होती, म्हणूनच ही खानावळ जेमतेमच पण

विशेष सुरळीत चालली होती. यांत बाहेरच्या खानावळीसारखा भपका नव्हता, कीं कांहीं नव्हतं. जें होतं तें अगदीं साधं अन् व्यवस्थित—अगदीं घरगुती थाटाचं होतं.

मी आलें त्यावेळीं सुहास बाहेर गेली होती. मी आईला विचारलं. सुहास गाणं शिकायला गेली आहे असं मला त्यांच्याकडून कळलं. सुहास गाणं शिकायला जाते तर !

सुहास आणि संगीतशिक्षण !

तारीखः—५ जुलै १९३७ सोमवार

अगदीं सकाळींच सुहास माझ्याकडे आली होती. तिच्या हातांत 'संगीताचा शिक्षक' या नांवाचं एक पुस्तक होतं आणि आणखीही बरीचशीं इतर सटरफटर लहानशा आकाराचीं पुस्तकं व कांहीं छापील कागदं होतीं.

आली; मला वाटलं ती फार घाईत असेल; पण ती आली तें तब्बल तासभर बसली.

आणि त्या तेवढ्या वेळांत तिनें जर तोंडपाटिलकी कसली केली असेल, तर 'इन्शुअरन्स'ची !

कुठल्याशा एका प्रॉव्हिडंट विमा कंपनीची तिनें एजन्सी घेतली होती, आणि त्यांत मी माझ्या नांवें हप्ते भरायला सुरवात करावी अशी ती मला गळ घालूं लागली.

त्यानंतर तिनें मी वसंताला गळ घालावी असा आग्रह करायला सुरवात केली.

वसंताला मीं गळ घालूं ? वसंताकडे जायचं ?

आणि मी तर त्याच्याकडे जाण्याला टाळूं पहाते आहे.

पण मी हें हिला कसं सांगू ? माझ्या मनाच्या दुर्बलतेचा किंवा सबलतेचा धागा दुसऱ्यापुढें उकलला जावा अशी माझी इच्छा नव्हती. पण मग 'नाहीं' तरी कसं म्हणूं मी ?

तारीखः—६ जुलै १९३७ सोमवार

कालिदासाचं तें शाकुंतल, तें कुमारसंभव, तें मालविकाग्निमित्र, तें मेघदूत ! साऱ्यांतच कशी प्रणयाची गर्दी !

प्रणयभावना ही खरोखरीच कां इतकी—?

मी कुमारसंभव वाचीत होतें. त्यांतल्या त्या श्लोकावर विचाराचं घोडं अडलं. मी तिथंच थांबलें अन् मनाशीं शांतपणें स्वस्थ विचार करूं लागलें.

**"हरस्तुकिंचित्परिलुप्तधैर्यश्चन्द्रोदयारंभ इवाम्बुराशिः**
**उमामुखेबिम्बफलाधरोष्ठे व्यापारयामास विलोचनानि ॥"**

'केनापि कामेन' तपश्चर्या करणाऱ्या मनोबलिष्ठ श्रीशंकराच्या मनांत—

**"सर्वोपमा द्रव्यसमुच्चयेन**
**यथाप्रदेशेन विनिवेशितेन**
**सा निर्मिता विश्वसृजा प्रयत्ना-**
**देकस्थ सौंदर्यदिदृक्षयेव ॥"**

विधात्यानें सर्व प्रकारचें सौंदर्य एके ठिकाणीं पाहावयास मिळावें म्हणून मुद्दाम निर्मिलेल्या त्या सौंदर्यसंपन्न यौवनमध्यस्थ अशा

उमाच्या ओठाकडे पाहून प्रणयभावना जागृत झाली आणि त्यायोगें त्याच्या मनांत रतिभावाचा उदय झाला, असं कालिदास म्हणतो.

परवांचं तें पद्मावतीच्या पायऱ्यावरील, पाण्यालगतचं वसंताचं सान्निध्य! माझ्या मनांत त्यावेळीं प्रणयभावना जागृत झाली होतीच कीं! पण मग मी प्रयत्नानें ती मारली अन् निघून आलें.

ज्या कामदेवाला शंकारानें जाळून टाकलं, आपल्या मनांतला कामभाव दडपला, त्याच कामभावाच्या आहारीं शेवटीं ( आठव्या सर्गांत ) श्रीशंकर गेलेच ना !

जें देवादिकांना शक्य झालं नाहीं, तें मी—मला तरी कसं शक्य होईल ?

ज्या पार्वतीच्या मुखावलोकनानें, शंकरानें आपल्या मनांत उद्भवलेल्या रतिभावाचा नाश केला त्याच पार्वतीच्या आहारीं त्याच रतिभावाच्या उत्तानावस्थेंत शंकर गेले ना !

माझं वागणं बरोबर आहे कां ?—नाहीं, सहन होत नाहीं आतां हा एकाकीपणा ! ही एकलेपणाची आग भडकते–असह्य होते.

जाणार ! मी वसंताकडे जाणार ! !

त्याच्या गळयाला मिठी मारून–त्याला घट्ट कवटाळून मी हा एकाकीपणा–माझ्या मनाची ही तगमग—ही आग—एकलेपणाची आग—नाहींशी करणार !

भावनेची तीव्रता ! भावनेची प्रखरता ! ! भावनेची प्रकर्षता ! ! !

वसंत ! माझा वसंत ! ! होय , माझाच तो !

वसंत ! वसंत ! ! वसंत ! ! !

## २ वियोग !

पायांवरून निर्मलेनें दुलई बाजूला सारली. किंचित् मान कलती करून तिनें कॉटपलीकडे एक ओझरती दृष्टि फिरवली. नंतर ती उठून बसली. तिनें आपल्या रेशमासारख्या मऊ, भुंग्यांच्या थव्यासारख्या काळयाभोर, विपुल, अस्ताव्यस्त केशभारावरून सहजेंपणें लालित्यपूर्ण कसबीनें हात फिरवला, एक दीर्घ जांभई दिली; आणि मच्छरदाणीचे पडदे वर सारून ती कॉटवरून खालीं उतरली.

एक, स्वतः बनवलेला अगर आईने करून दिलेला चहाच ती यावेळीं पीत असे. या व्यतिरिक्त ती इतर कुणाच्या हातचा चहा घेत नसे; नव्हे, तिचं समाधानच होत नसे. इतर वेळेच्या चहाचा

प्रश्न जरा निराळा असे. त्यावेळीं तिचा हा अट्टाहास ती स्वतः होऊनच चालूं देत नसे. मनाच्या समाधानासाठींच घ्यायचा झाला म्हणजें मात्र ती स्वतः हातानें बनवी किंवा आईला बनवायला सांगे.

" गंगू, कुठें गेलीस तरी तं इतक्यांत? ये गंगू– " निर्मलेनें गंगूला हांक मारली. गंगू आली. तिला स्टोव्ह पेटवायला सांगून न्हाणीवरांत गेली. ती न्हाणीघरांतून परत येईपर्यंत गंगूनें चहासाठीं एक कप पाणी पातेल्यांत घेऊन, स्टोव्ह पेटवून त्यावर ठेवूनही दिलें होतें. परत आल्यावर प्रथम तिनें तोंड, हात, पाय वगैरे स्वच्छ शुभ्र टॉवेलनें कोरडे केले. नंतर ती स्टोव्हजवळ आली. तिनें झांकणी दूर केली अन् त्या पातेल्यांतल्या पाण्याकडे नजर न्याहाळली.

" कां ग गंगू, तुझ्यासाठीं नाहीं ठेवलंस पाणी ? " तिनें एकच कप पाणी आहे असें पाहिल्यानंतर गंगूला विचारलें.

" म्या भल्या फाट घेतला कीं बाईसाब ! " गंगूनें उत्तर दिलें.

कां, कोण जाणे; निर्मलेला आज एक प्रकारचा नवीनच उत्साह वाटत होता. सकाळची वेळ, म्हणजे मनाचा आल्हाद द्विगुणित करणारी. बाहेर व्हरांड्यांत ऊन पडलं होतं. त्याखालील एका कुंडींतल्या गुलाबाच्या नवीनच लावलेल्या लहानशा रोपट्याला दोनच, पण आकारानें जरा लहान असलीं तरी विशेष गोल अन् डौलदार फुलं आलीं होतीं. जणूं हंसतमुखानं तीं दोन्हीं फुलं आपलं स्वागतच करीत आहेत असं निर्मलेला वाटलं असावं, कारण तिची नजर त्या फुलांकडे जातांच तिनं मोहक स्मित केलं. नुक्तेंच ' कोपरान पेस्ट ' नें ब्रशाच्या साहाय्यानें स्वच्छ केल्यामुळें आधींच शुभ्र असलेले तिचे ते अणकुचीदार टोकाचे दांत जास्तच पांढरे

शुभ्र अन् विलोभनीय दिसत होते. त्या सौम्यस्मितान, जणु एकादी भारी किंमतीच्या मोत्यांची माळ अलगत पेटीच्या किलकिलत्या झांकणांआडून पाहिली म्हणजे कशी दिसते, तशीच दिसली ती तिच्या अधराआड दडलेली मौक्तिकमाला.

स्टोव्हवरील पाण्याला उकळी फुटली होती. तें सळसळत होतं. तिच्या हृदयांत अशीच उकळी फुटली होती. पण ही उकळी तिच्या वृत्ती सुखद करणारी होती, भावनांना बहर आणणारी होती. ती क्षणाक्षणाला उसळत होती. गालांवर दोन गुलाब टवटवले होते. स्टोव्हच्या उष्णतेनें कपोलावर घर्मबिंदू उठले होते, ते चमकत होते. तिनें हातांतल्या रुमालानें ते पुसून काढले. चेहरा मात्र नेहमींपेक्षांही विशेष प्रफुल्ल दिसत होता.

चेहऱ्यावरील प्रफुल्लतेला कारणही तसंच विशेष, सुखद अन् उन्मादी लहरींनं बहरून जाण्यासारखं घडून आलं होतं.

* * * *

कालचाच तो टेनीसकोर्टावरील प्रसंग आठवला. ती टेनीस खेळायला गेली होती—छे, उगाच 'हजर' या शब्दाला कालिमा येऊं नये म्हणून गेली होती ती टेनिसकोर्टवर. ती गेली तें तिथल्या बागेंतल्या एका कोपऱ्यांत हिरवळीवर पाय पसरून बसली.

काल तिनें कालिदासाचें रघुवंश काव्य वाचण्याचा प्रयत्न केला होता. त्यांतले कांहीं श्लोक तिला आठवूं लागले. ती बसली होती त्यासमोरच एक कृष्णकमळाची लता वाढली होती. तीं काळींपांढरीं फुलं उन्हानं जास्तच शोभिवंत अन् मोहक दिसत होतीं. कांहीं वेळ

तिनं त्यांकडे अगदीं एकाग्रपणें पाहिलं. त्यावेळीं तिला रघुवंशांतला तो रामविलापावेळचा श्लोक आठवला—

> " इमां तटा शोकलतांच तन्वीं
> स्तनाभिराम स्तबका भिनम्राम्
> त्वत्प्राप्ति बुद्ध्या परिरब्धुकामः
> सौमित्रिणा साश्रुरहं निषिद्धः "

विरहानें व्याकुळ झालेल्या रामाच्या प्रणयपूर्त भ्रांतिष्ट मनस्थितीचें हें वर्णन तिच्या हृदयाचा ठाव घेण्यास पूर्ण समर्थ होतें. वसंताचं आपल्यावर प्रेम आहे याचीही तिला पूर्ण जाणीव झाली होती. स्वतःचंही वसंतावर प्रेम आहे याचीही खात्री तिला झाली होती. पण तरीसुद्धां ती हें अंतर्यामांत रुजलेलं प्रेम आंतल्याआंतच दडपूं पाहात होती. तिला वाटत होतं आपण लग्न न करतांच राहावं. प्रेमभावना हीच कांहीं आयुष्यांतील सर्वस्व नव्हे; मग तिचें एवढें स्तोम तरी कां माजवा—असा विवेक ती करी अन् त्या प्रेमभावनेपासून आपल्या मनाला दूर—दूर—पळविण्याचा प्रयत्न करी, पण तें बेटें मन दूर पळेच ना ! पायांत लोढणं बांधलेल्या जनावरासारखं तें अडखळूं लागलं.

केवळ, उमाच्या पक्व तोंडल्याप्रमाणें दिसणाऱ्या ओंठाकडे पाहिल्यानें शंकराचें धैर्य किंचित्सें लुप्त झालें, त्याचप्रमाणें निर्मलेचेंही धैर्य—संपूर्ण धैय—तोच श्लोक वाचून—नव्हे, त्या सारखेच आणखी कित्येक श्लोक वाचून—अन् तसलींच शृंगारिक व संमोहसमर्थक दृश्यें पाहून लुप्त झालं होतं. केव्हां वसंताच्या गळयाला

मिठी मारेन, त्याच्या हंसऱ्या चेहऱ्याकडे स्मित-नाचऱ्या नजरेनें पाहीन अन् अन्—असं तिला झालं होतं.

तिची ही व्याकूलयुक्त उत्सुकता फार वेळ ताणली गेली नाहीं. वसंतही तिकडे सहज आलेला तिला दिसला. तिनें त्याला हांक मारली.

वसंत आला तो तिच्यासमोर हिरवळीवर बसला. त्यानें डोक्याला टोपी घातली नव्हती. त्याचे केस काळे होते, पण सायंकाळच्या उन्हांनं ते चमकत होते. केसावरून त्यानें नुसता हात फिरवला होता, ते नीटसे विंचरले नव्हते हें त्या अस्ताव्यस्त केसांवरून कळून येण्यासारखं होतं. पण तरीसुद्धां त्याचे केस त्याला शोभून दिसत होते. त्याच्या आधींच सुंदर असलेल्या चेहऱ्याला त्या केशभारानें जास्तच शोभा आणली होती.

सूर्याची सोनेरी प्रभा पश्चिम क्षितिजावर पसरली होती. निर्मलेच्या चेहऱ्यावर कांहींसा काळोखच पडला होता, पण त्या काळोखांतही तिचा चेहरा जास्त खुलून दिसत होता. तारुण्यांतलं मौल्यवान लेणं तिच्या गौरं तनूवर विलसत होतं. नुकत्याच उमललेल्या मोठ्या—गोल—डौलदार गुलाबाच्या फुलाच्या कडेच्या चारसहा पाकळ्या तोडून टाकाव्यात अन् नंतर तें फूल कोवळ्या उन्हांत धरावं म्हणजे कसं विलोभनीय अन् मोहक दिसतं, तसंच निर्मलेचं तें त्यावेळचं लज्जायुक्त सुंदर मुख दिसत होतं. त्या फुलांच्या पाकळ्यांच्या कडेचा फिकट गुलाबीपणा, त्याजवळचा पांढुरकेपणा अन् त्याही-जवळचा—परागाभोंवतालचा किंचित् पिवळसरपणा व परागाचा

हिरवट–पिवळसरपणा–या साऱ्यांची मधुर मोहकता तिच्या हंसऱ्या चेहऱ्यावर स्पष्टपणें विशोभित झाली होती.

तीं दोघंही तिथून उठलीं. जवळच्या कारंजाच्या कठड्यावर जाऊन बसलीं. निर्मलेनें तें हेलावणारं पाणी हातानें उडवायला सुरवात केली. कारंजांतून उडणाऱ्या पाण्याच्या तुषारांत तें निर्मलेनें उडविलेलं पाणी विलीन होत होतं, अन् त्यांच्या बिंदुबरोबरच त्याचेही असंख्य बिंदू होऊन त्या इंदूसमान भासमान् होणाऱ्या शीतलोदक समुदायांत पडत होतं.

वसंतानें येतांना एक मोठं टपोरं गुलाबाचं फूल तोडलं होतं. त्यानें सहज त्या फुलाचा स्पर्श तिच्या गालाला केला अन्—

"फुलापेक्षां तुझ्या गालाचाच रंग जास्त भडक अन् मादक आहे कीं !" असं हंसत हंसत तो म्हणाला.

ती हंसली, लाजली–अन् लागलीच धरणीला न्याहाळूं लागली.

तिचं हें हास्य मोहक होतं. आधींच धुंद झालेल्या वसंताच्या मनाला त्या मोहक हास्यानें जास्तच भुरळ पडली अन् त्यानें हलकेंच तिची हनुवटी धरली–वर उचलली–अन्—

"पौर्णिमेच्या पूर्णइंदूची आल्हाददायक सुषमाच एकवटली आहे हं इथं." तिच्या नाचऱ्या नजरेशीं नजर भिडवीत तो म्हणाला.

"आणि म्हणूनच वाटतं या हृदयसागराला भरति आली आहे !" हें ती म्हणाली खरी पण म्हणतांना लाजली किती !

किलकिलत्या अनिमिष नेत्रांनीं तिनें त्याच्याकडे पाहिलं.

त्याच्या कपाळावर केस आले होते. ते केस मागें सारण्यासाठीं तिनें हात उचलला अन् केसाला लावला. त्यावेळीं तिचें तोंड जास्तच उन्नत झालें होतें–त्या तिच्या धनुष्याकृति भुवयांखालील ते जोत्स्नेप्रमाणें विलसणारे टपोरे नेत्र आपल्याला खुणावीत आहेत असं वसंताला वाटलं. त्यानें आपलं तोंड खालीं घेतलं—

त्या संधीचा त्यानें फायदा घेतला.

तीं दोघेही हर्षचित्त झालीं—'

* * * *

हाच प्रसंग तिला पुन्हःपुन्हां दिसत होता. जणूं आत्तांसुद्धां आपण त्याच प्रसंगाशीं समरस झालों आहोंत असं तिला वाटत होतं. त्या तल्लीनेंत चहाची पूड पाण्यांत टाकण्याचें ती विसरून गेली.

आणखी अशीच या तल्लीनतेंत ती किती वेळ बसलीं असती कोण जाणे, पण तिची ती तल्लीनता भंगली. तिच्या कानांवर परिचित पण मोहक आवाज आदळला–ते भावगीताचे सूर होते.

वसंतच भावगीत म्हणत येत होता.

**"मग विसर हवा तर हा क्षण गे**
**क्षण हाच जवळ ये तूं पण गे !**
**अनंत जन्मांचें शुभसंचित**
**क्षणीं याच गे होवो कुसुमित**
**दिव्य करो हा क्षण अविलंबित**
**ये करुं दे आत्मसमर्पण गे**
**क्षण हाच जवळ ये तूं पण गे !**

ध्रुव धरणी ही चरणाखालीं
वितळुनि जावो नच पाताळीं
तुझि माझी जों ग्रंथि न झाली
मग उधळो तीचा कण कण गे
क्षण हाच जवळ ये तूं पण गे ! ”

*　　*　　*　　*

वसंत आणि निर्मला या दोघांनीं चहा घेतला, आणि नंतर तीं उठलीं. खोली बाहेर येतात तों सुहास पायऱ्या चढून वर येत आहे असं त्यांना दिसलं. सुहास वर आली आणि तिनें निर्मलेला विचारलं—‘ विभाकर आहेत कां घरांत ? ”

निर्मलेला विभाकर घरांत आहे का नाहीं हें माहित नव्हतं. अर्थात् तिनं उत्तरच दिलं नाहीं. पण येवढं मात्र खरं, कीं ‘ नेहमीं आपल्याकडे येणारी ही सुहास आज विभाकराकडे काय म्हणून नी कशासाठीं आली बरं ! ’ अशी ओझरती कल्पना तिच्या मनांत तरंगून गेली.

वसंतानें आपली सायकल घेतली, आणि बाहेर तो रस्त्यावर आला.

रस्त्यावर तीं दोघें आणखी बराच वेळ बोलत उभीं होतीं.

वसंत गेल्यावर तो दिसेनासा होईपर्यंत निर्मला त्याच्या पाठमोऱ्या आकृतिकडे पाहात होती. त्यानंतर ती आंत आली.

निर्मलेचा चेहरा उदास दिसत होता. वसंत येण्यापूर्वीं चहा बनवण्याच्या वेळची तिची प्रसन्नता अन् प्रफुल्लता आतां यावेळीं लोपली होती. संध्याकाळच्या वेळीं रम्य वनश्रीवर अस्ताचलावरील

भास्कर संपूर्ण कृपादृष्टीनें पाहातो, त्यावेळीं ती सृष्टीदेवतेची प्रसन्नता मनाला आल्हादवीत नाहीं का, तद्वतच निर्मलेचीही प्रसन्नता पाहा-णाराच्या मनाला फुलकित करून सोडीत होती; पण त्याच वेळीं त्या नयनरम्य सृष्टिदेवतेवर कुटिल मेघांनीं आपली मत्सरग्रस्त दृष्टि फिरविली म्हणजे सृष्टिदेवता कशी उदास दिसते–तशीच निर्मला–ही उदास दिसत होती. पण सृष्टिदेवता ही त्यावेळीं जरी उदास दिसली, तरी त्या उदासीनतेंतही तिच्या सौंदर्याची दीप्ती कांहीं झांकळून जात नाहीं ! तद्वतच, आधींच सुंदर असलेल्या अन् यौवनानें जास्तच सुंदर दिसणाऱ्या निर्मलेचा चेहरा उदास झाला होता, तरी त्या उदासीनतेंतही एक प्रकारचा विशेष आकर्षकपणा स्पष्टपणें उठून दिसत होता.

उदासीनतेंतही दिसणाऱ्या या विशेष आकर्षत्वाचें आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. कारण सर्वसाधारण सिद्धांतच आहे कीं,—

‘ किमिवहि मधुराणां मंडनम् नाकृतीनाम्— ’

आधींच ती उदास झालेली ! त्यांत आणखी जास्तच भर पडली.

सुहास रात्रौ परगांवीं जाणार होती.

सुहास म्हणजे तिची मैत्रीण होती. साहजिकच तिला तिच्या वियोगाची तीव्रता जाचणार हें निश्चित.

उदासीनतेची वृद्धी झाली. खिन्नता वाढली.

पहिल्या उदासीनतेचं कारण वसंताचा वियोग !

दुसऱ्या उदासीनतेचं कारण सुहासचा वियोग !

दोन प्रेमी सुहृदांचा वियोग ! !

* * * *

## सुहास परगांवीं कां आणि कुठें चालली ?

सुहास ही परित्यक्ता स्त्री आहे. तिच्या आईनं खानावळ घातली होती वगैरे गोष्टींची माहिति मागेंच मला झाली आहे.

सुहासच्या सासरची श्रीमंती बरीच आहे म्हणे. सुहासच्या वडिलांनीं स्थळ निवडतांना कसलीच हयगय केली नव्हती, पण बिचारीचं नशीब कुठें नी कसं घसरलं कोण जाणें! सुहासच्या वडिलांना बरं वाटत नव्हतं त्यावेळीं पित्याच्या शुश्रुषेसाठीं आलेली सुहास वडिलांच्या प्राणोत्क्रमणानंतरही, नव्हे त्यांची सर्व उतरक्रिया-द्विवसमासादिक कृत्यें—उरकल्यानंतरही परत सासरीं जाऊं शकली नाहीं.

श्रीधरपंतांच्या—सुहासच्या वडिलांचे नांव—पश्चात लक्ष्मीनें जी पाठ फिरवली ती कायमचीच—निदान हा वेळपर्यंत तरी म्हणायला हरकत नाहीं !

प्रपंचाचा भार वाहायचा म्हणजे हलकीसलकी गोष्ट नव्हे, त्यांत अब्रूनें द्विवस कंठायचे म्हणजे फारच कठीण ! पण त्या बिचाऱ्या सच्छील माउलीनें धीर धरून कसेबसे द्विवस रेटायला सुरवात केली. अखेरीस आर्थिक टंचाईच्या नंग्या तरवारीखालीं सांपडलेल्या त्या बाईनें—सुहासच्या आईनें—मोठ्या मुष्किलीनें—लाजलज्जा मन—सारं कांहीं मारून खानावळ काढली अन् कशीबशी खर्चाचीं तोंडें परस्पर मिटवूं लागली.

गरीबींतलीं दुःखं काय असतात हें गरीबच सांगूं शकेल. इतरांना त्याची कल्पनाही येणं शक्य नाहीं.

नाना प्रकारचे, नाना मताचे, नाना आचाराविचारांचे लोक खानावळींत जमायचे; नाना विषयांवर वाटेल त्या भाषेंतून वादविवाद व्हायचे, मग कधीं त्यांत चांगले विषय निघतील तर कधीं वाईटाचीही परिस्फुटता व्हायचीच. श्लीलअश्लीलतेचा तर प्रश्नच नको. मात्र याचा परिणाम कांहीं चांगला झाला नाहीं.

सुहासच्या मनाचा तोल गेला.

गरिबीच्या वेदना तिनें सहन केल्या होत्या—सहन करीत होती. त्यांची असह्यता वृद्धिंगत होत होत अखेरीस ती इतकी विकोपाला गेली, कीं वाटेल तें दिव्य करूं पण आपण पैसा मिळवून ही आपली गरिबी नष्ट करूं असा निश्चय सुहासनें केला.

दिव्य !—? ? ?

कसलं दिव्य ?

* * *

एका ओळखीच्या ऑर्गनायझरकडून सुहासनें एका विमा कंपनीची एजन्सी मिळविली. त्या कंपनीलाही स्त्री एजन्टाची जरूरी होतीच. मारे तिनें सुहासला टर्म्सच्या अटी सढळ हातानें खुल्या करून दाखवल्या. सुहासला वाटलं, घेतली थोडीशी मेहनत, तर निदान महिन्याकांठीं कमींतकमीं चाळीस—पंचेचाळीस रुपये तरी मिळतील. पण—तें नुसतं ' वाटणं ' होतं. प्रत्यक्षांत तिला निराळाच अनुभव आला.

काम मिळणं दुरापास्त होऊं लागलें. नवख्या कंपनीला काम तरी कसं जोरानें मिळायचं ? आणि सुहासनें तर ' आंकड्यावरी ' स्वतःला कंपनीशीं बांधून घेतलं होतं.

ती प्रत्यक्ष स्थिति पाहून ती घाबरली, भांबावली आणि अखेरीस कुणाला तरी मदतीला घ्यायचं असं तिनें ठरविलं.

ज्याला तिनें मदतीला घेतलं तो चांगला हुषार होता. समाधान-कारक काम मिळवून देण्याइतका तो लायकही आहे; पण, पण तेवढ्यासाठीं त्यानें सुहासला—

* * * *

हा हुषार सुहासचा मदतनीस कोण ?

सुहासचा चेहरा रडकुंडीला आला होता. त्यांत भुकेल्या आर्त-तेची झांक स्पष्ट अभिप्रेत झाली होती.

महिना होऊन गेला तरी अद्यापि सुहासला एकही काम मिळालं नव्हतं. दुसराही महिना उलटून गेला. स्वतःच्या आत्यंतिक अडचणी-साठीं सुहासनें प्रथमच कंपनीकडून थोडीशीं रक्कम उचलली होती. सहाजिकच तिच्यामागें कंपनीचें झेंगट सुरू झालें. त्या रोजच्या जाचानें ती जास्तच त्रासली, रडकुंडीला आली आणि अखेरीस, नाइलाज आहे असं कळल्यानंतर तिनें निर्मलेच्या भावाकडे—विभा-कराकडे—धांव घेतली.

विभाकरानें अवघ्या वीस दिवसांत कल्पनातीत काम मिळवून आणलं. तें सारं काम सुहासच्या नांवें रुजूं झालं.

एका जाचक जाळ्यांतून सुहास मुक्त झाली होती.

पण दुसऱ्या जाचक जाळ्यांत—?

हाच तो सुहासचा मदतनीस—विभाकर—!

* * * *

### पण मग रत्नाचें काय झालें ?

होय, विभाकराचे रत्नावर प्रेम आहे हें खरं आहे; पण—?

रत्ना रूपानें लाखांत उठून दिसण्याइतकी सुंदर नसली, तरी हजारांत तिचा नंबर खास दुसरा किंवा तिसरा लागला असता.

रत्ना ही एका गुजराथी शेटीयाची मुलगी—शेटीयाची कसची ?—त्या शेटीयानें ठेवलेल्या बाईची मुलगी !

पण इतक्यांतच कशाला ही सारी हकीकत सांगू ? पुढें ओघानें येईलच. किंवा, नाहीं आली तरी तिचं विशेषसं—

*   *   *   *

सुहासनें ( ? ) मिळवून आणलेल्या कामावर कंपनी इतकी खूष झाली, कीं सुहासला कंपनीनें ऑर्गनायझर नेमलं.

आतां सुहासही बेडरपणानें साऱ्या कृत्यांना लाथेनें मान नमवायला लावत होती.

झोन तिकिटाची सुरवात झाली होती. कंपनीनें सुहासला भाडेंखर्च देण्याचें कबूल केलें. सुहासनें आपण होऊनच परगांवची ट्रिप करून यायची भाषा कंपनीजवळ काढली होती. कंपनी तरी कशाला नको म्हणते ? परगांवीं सुहास कंपनीच्या कामासाठीं चालली होती. ती सारखी फिरणार होती.

मात्र एकटी जाणार नव्हती—!

बरोबर तिचा मदतनीस जाणार होता—!

*   *   *   *

### हा वसंता कुठें निघाला ?

निर्मला आणि वसंता—दोघेंही टेनिस खेळलीं नाहींतच. तीं तिकडे

बागेंतल्या हिरवळीवर अन् नंतर कारंजाच्या कठड्यावर कायसें गुलुगुलू बोलत बसलीं.

नंतर काळोख पडल्यावर व त्याची जाणीव झाल्यावर तीं दोघेंही तिथून उठली आणि नंतर सिनेमा पाहायला जायचं त्यांनीं ठरविलं. ठरविल्याप्रमाणें तीं दोघें सिनेमाथिएटरकडे गेलींही.

सिनेमा सुटल्यानंतर वसंतानें निर्मलेला घरीं पोहोंचविलं आणि मग तो स्वत: घरीं गेला.

घरीं कोणी पाहुणे—बडे पाहुणे—आले असल्याचं त्याला कळून आलं, पण त्यानें चौकशी केली नाहीं.

पाहुण्यांची वगैरे वाट पाहिली नाहीं—त्यानें कशाचीच चौकशी केली नाहीं, जेवण उरकून घेतलं आणि आपल्या खोलींत निघून गेला.

कॉटवर पडल्या पडल्या तो नुकत्याच घेतलेल्या सहवास-सुखाच्या आस्वादाचें मधुर चिंतन करीत होता.

सिनेमा सुरू झाल्यानंतर त्यानें सहज आळस देण्याच्या हेतूनें हात लांबवले तों डावा हात निर्मलेच्या उजव्या खांद्यावर गेला, त्यावेळीं निर्मलेनें लाजून केलेला आपला लटका निषेध, त्या लटक्या निषेधाच्या वेळची तिची ती मिस्कील तिरपी नजर—सारं कांहीं त्याच्या मनश्चक्षूंपुढें दिसूं लागलं.

सिनेमाचा अगदीं शेवटचा भाग पडद्यावर दिसत होता. त्यांतली नायिका पुढें पळते आहे आणि नायक मागें पळतो आहे असा तो पाठशिवणीचा खेळ चालूं असतो. शेवटीं एका लताकुंजांत

ती नायिका लपून उभी राहाते. नायक येतो, थोडा वेळ इकडे तिकडे तिला शोधतो. तोंच त्याच्या नजरेला लताकुंजांत दडलेली आपली प्रेयसी दिसते. हळूंच मागून जातो आणि तिच्या बुचड्यांतील सपर्ण बटमोगऱ्याचं फूल हलकेंच काढून घेतो. ती विलक्षण दचकते अन् भांबावल्या नजरेनें मागें वळून पाहाते, तोंच तो तिला घट्ट आलिंगितो अन् घाबरल्यामुळें लाल दिसणाऱ्या तिच्या गालांवर आपले ओठ ठेवतो.

तिकडे नायकानें नायिकेच्या गालांवर ओठ ठेवायला अन् इकडे वसंतानें निर्मलेच्या हाताचें चुंबन घ्यायला एकच गांठ पडली—

खेळ खलास ! गुड इव्हिनींग

* * * *

अशा या मधुर चिंतनांत किती वेळ तो दंग झाला असता न कळे. पण लागलीच त्याच्या कानांवर हांक ऐकूं आली म्हणून तो उठला अन् खोलीबाहेर पडला.

खालीं गेल्यावर त्याला कळलं, कीं उद्यां सायंकाळीं आपल्याला हें गांव सोडून मुंबईस जावें लागणार.

त्या आलेल्या पाहुण्यांनीं वसंताला मुंबईच्या एका कापडाच्या गिरणींत मॅनेजरच्या हाताखालीं उमेदवार म्हणून मॅनेजरचें काम शिकवायला न्यायचें कबूल केलें होतें.

वसंतानेंही तें मनावर घेतलें व जाण्याची तो तयारी करूं लागला.

सकाळीं उठल्यावर प्रथम तो निर्मलेकडे आला, पण चहा घेतल्यानंतर त्याला तिच्या कॉटवरील पडलेल्या मनीबॅगेंत कांहीं वस्तू

पाहायला मिळाल्या.· त्याचं माथं भडकलं. तो क्षणही न थांबतां बाहेर पडला. जातांना तो त्याबद्दल निर्मलेला कांहींसं टोंचून बोलला.

त्याचे ते उद्गार ऐकून निर्मला घाबरली.

वसंताचें मस्तक संशयपिशाच्चानें भारलें होतें.

तो तावातावानें निघून गेला.

बिचारी निर्मला बुचकळ्यांत पडली.

खरी स्थिति सांगूनही वसंताचें मन वळूं शकलें नाहीं याबद्दल तिला भारी वाईट वाटलें. खिन्नता वाढली.

तिनं परोपरीनें त्याची विनवणी केली. पण त्याचें एकच म्हणणें होतें—' त्या वस्तु तुझ्याच असाव्यात. '

वसंता गेला, पण निर्मलेच्या अंतर्यामाचा भेद करून गेला. तिच्या काळजाच्या ठिकऱ्या ठिकऱ्या झाल्या.

या दोघां जोडप्यांत वितुष्ट आणायला कारणीभूत झालेल्या अशा त्या वस्तू तरी कोणत्या ? अन् कोणाच्या ?



## ३ सुहास— ?

त्या वस्तु कोणत्या अन् कुणाच्या ?

सिनेमा पाहून निर्मला परत आली, तों साडेदहा वाजले होते.

ती वर ओटीवर यायला अन् सुहास आंतून बाहेर जाण्यासाठीं विभाकराबरोबर ओटीवर यायला एकच गांठ पडली.

सुहास घरीं निघाली होती. ती फार घाईत होती.

निर्मलेला पाहिल्यानंतर तिच्या चेहऱ्यावर विलक्षण फरक पडला. आधींच, नको असलेलं पक्वान्न खाल्यानें अन् त्यांतही अजीर्ण झाल्यानें चेहऱ्यावर जी एक प्रकारची कळा येते, तशीच कांहींशीं विलक्षण कळा तिच्या चेहऱ्यावर दिसत होती. पण त्यांत निर्मलेच्या दर्शनाबरोबर फरक पडला. वृत्ती भांबावल्या—ती कांहींशीं घाबरलीच.

पण लागलीच तिनें आपल्या मनाचा तोल सांवरला. अन् तिनें निर्मलेला हंसत हंसत 'कुठें गेली होतीस इतका वेळ ?' असं विचारलं.

तिच्या आवाजांत कंप अन् भेदरटपणा भरला आहे याची जाणीव होण्यासारखी होती, पण निर्मला बेभान अन् धुंद अवस्थेंत होती. टेनिसकोर्टवर वसंताच्या सान्निध्यांत उपभोगायला मिळालेल्या अल्पशाच पण अनुपमेय सुखाच्या मधुर चिंतनांच्या ओझ्यानें तिच्या साऱ्याच वृती न् वृत्ती बहिरून गेल्या होत्या -- धुंद झाल्या होत्या. तेव्हां साहजिकच सुहासच्या आवाजांतला तो फरक तिला जाणवण्यासारखा नव्हता. तिनेंही हंसत हंसत "झाला खरा उशीर ! सिनेमाला गेलें होतें ग आज." असें उत्तर दिलें अन् सुहासचा हात धरून तिला आपल्या खोलींत नेलें.

सुहास अन् निर्मला काय बोललीं कोण जाणे ! थोड्या वेळानें सुहास उठून गेली.

मात्र जातांना ती निर्मलेला बजावून सांगत होती, कीं—"माझी ती मनीबॅग वर ठेवूं नकोस हं ! आणि जरी मनीबॅग तुला हवी असली, तरी आंतल्या त्या जिनसा तरी—नीट कुणाला न दिसतील अशा ठिकाणीं ठेवून दे. नाहींतर—" इत्यादि.

रात्रभर निर्मला विचार करीत होती.

सुहास—आणि असं करील ?—मग—मग ?

सुहास ? ? ?

सुहास म्हणजे एक कोडं आहे तर !

* * *

## सुहासनें काय केलें ?

सुहास घरीं आली. जेवायचं नाहीं असं आईला सांगून ती सरळ माडीवर गेली. तिनें आपला बिछाना पसरला अन् अंग टाकून दिलं.

सुहासच्या मनाची तळमळ वाढत होती.

गुन्ह्याचा पहिला क्षण किती भांबावून सोडतो याची प्रत्यक्ष जाणीव तिला झाली.

साऱ्या वृत्तींना उकळलेल्या तेलाचा चटका बसतो आहे असं तिला वाटायला लागलं.

खोल रुतलेला कांटा काढायचा म्हणजे आधीं तापत्या तेलाचा चटका द्यावा लागतो.

हव्यास ! मग तो कसलाही असो. प्रेमाचा, पैशाचा, देशाच्या भवितव्याचा अथवा आणखी कसलाही असो. हव्यास हा रुतलेल्या कांट्यासारखा आहे. जोपर्यंत हव्यासाची पूर्तता होत नाहीं, तोंपर्यंत मनांत तो शल्यासारखा बोंचत राहतो. रुतलेल्या कांट्यासारखा रुतून बसतो. हव्यासाची पूर्तता करून घ्यायची म्हणजे—सुधे-पणानं झाली तर ठीक, नाहींपेक्षां सर्वस्वाचा त्याग करायलाही मनुष्य तत्पर होतो.

रुतणाऱ्या कांट्याचं नाहीं कां; न काढावा तरी सलतो, काढण्याचा प्रयत्न केला, तरी वेदनांची वृद्धि होते. अन् अखेरीस अशी अवस्था निर्माण होते, कीं त्या वेदनांची सुसह्यता अशक्य झाली म्हणजे तापत्या तेलाचा चटका घ्यायलाही तो मागेंपुढें पाहात नाहीं.

भावना ! वासना ! हव्यास !

मानसिक अवस्थेची परमावधी म्हणजे ही अशीच जाचक अन् प्रसंगीं मारकही असते.

सुहास तळमळत होती.

तिच्या मनीं दबलेल्या एका हव्यासाची परमावधी इतक्या विकोपाला गेली होती, कीं त्याच्या प्राप्तीसाठीं ती आज वाटेल तें करायला तयार झाली होती. पण जग ! ती वाटेल तें करायला तयार झाली असेल, पण जगानें तिला तसं सुधेपणानं करूं दिलं पाहिजे ना ! जग तिच्या असहाय्यतेचा फायदा घेतल्याशिवाय थोडंच राहील ?

तिला पैसा हवा होता. पैशाच्या पोटांत साऱ्या विश्वांतली मधुरता अन् चारुता एकवटली आहे अशी तिची पक्की खात्री झाली आहे. जगांतला मानमरातब सारा पैशाच्या सहवासांत आहे. पैसा हीच लक्ष्मी ! लक्ष्मी म्हणजे देवतेचा अवतार ! मग तो पैसा मिळविणं, किंबहुना लक्ष्मीला प्राप्त करून घेणं म्हणजे वावगं असं कांहींच नाहीं असं तिला वाटे.

पण पैसा सरळमार्गानं अन् शुद्ध–खुल्या दिलाच्या ठेवणीनं मिळेल कां कधीं ?

सुहासला या साऱ्या अडचणी–खांचखळगे–दिसत होते. त्या साऱ्यांची पूर्ण जाणीव तिच्या मनाला झाली होती. पण तिनें मुळीं बंडखोरीच स्वीकारायची असं ठाम ठरविलं होतं. बंडखोर कधीं चांगल्यावाइटाची तमा बाळगतो का ? तो कशाचीच पर्वा करीत

नाहीं.—सुहासनेंही चांगल्यावाइटाची तमा बाळगायची नाहीं, कशाचीच पर्वा करायची नाहीं असं ठरविलं.

प्रथम तिनें विमाकंपनीची एजन्सी घेतली. तें काम अशक्य आहे याची खात्री पटल्यानंतर तिनें विभाकराला मदतीला घेतलं.

विभाकरही तिला मदत करायला आनंदानें तयार झाला. पण—पण —???

सुहासच्या अंगावर कांटा आला ! तिच्या अंगाला दरदरून घाम सुटला. विभाकराच्या हाताचा गालाला झालेला स्पर्श तिला निखाऱ्या-सारखा दाहक वाटला त्यावेळीं, पण स्वतःला जाळूनच घ्यायचं आहे असं तिनं ठरविलं होतं. तिची बंडखोरी प्रवृत्ती जागृत झाली होती अन् अखेरीस —!

पण कांहीं झालं तरी तिला जगांत वावरायचं होतं.

कितीही बेरडपणानं वागायचं मनाशीं ठरविलं, तरी मनुष्य शक्यतों स्वतःचा बेरडपणा छपला जाईल अशाच काळजीनें जगांत बेडरपणानें वागत असतो.

सुहास तरी या गोष्टीला अपवाद कशी ठरेल ?

विभाकराच्या म्हणण्याला ती तयार झाली.

त्या दाहक स्पर्शाच्या दाहकतेंत तिनें स्वहस्तानें आपल्या चांगुल-पणाची होळी पेटविली.

मात्र बहिरंग भाजणार नाहीं—पाहाणारांनाही त्याची कल्पना येणार नाहीं अशी पूर्ण खबरदारी घेऊन नंतरच तिनें आग पेटविली.

 सुहास—?

सुहास !!! पैसा !!! हव्यास !!!

* * * *

स्वतःच्या सुरक्षिततेसाठीं तिनें कांहीं वस्तु खरेदी केल्या.

त्यासाठीं लागणारा पैसा विभाकरानेंच दिला.

प्रत्यक्ष बाजारांतून त्या आणल्याही विभाकरानेंच.

बिचाऱ्या सुहासला त्या कुठें मिळतात अन् कसल्या असतात याची पुसटशीसुद्धां कल्पना नव्हती.

पण एवढें मात्र खरें, कीं असं कांहीं सुरक्षिततेचं साधनअसल्याविना ती त्या होरपळवून टाकणाऱ्या—किंबहुना— विस्तवाशीं खेळावयास तयार झाली नाहीं—झाली नसतीही.

सुरक्षिततेची ही अट तिनेंच विभाकराला घातली अन् तिच्याच अट्टाहासाखातर त्यानें ती मान्य केली होती.

ज्या वस्तूच्या सहाय्यानें विस्तवाशीं खेळूनही ती होरपळून निघाली नाहीं, त्याच वस्तूमुळें निर्मला मात्र होरपळून निघाली.

* * * *

त्या वस्तूचें नांव ' ड्यूरेक्स. "

घरीं जाण्यापूर्वीं निर्मलेनें तिची मनीबॅग सहज उघडून पाहिली. त्यांत तिला तें दिसलं. तिनें सुहासला त्याची माहिती विचारली. पण सुहासनें कौशल्यानें टाळाटाळ करून तवढ्या वेळेपुरता तो विषय बदलला.

निर्मलेच्या मनांत मात्र त्या साऱ्या वस्तूंनीं दडी मारली.

किती तरी वेळ ती त्यांच्याकडे टक लावून पाहात होती मनांत विचार करीत होती. पण निर्णय असा कांहींच लागेना.

अखेर ती त्या विचारांतच निद्रावश झाली.

*    *    *    *

सकाळीं उठल्यानंतर चहा घेतांना वसंत आला.

तो बाहेर बसला, त्यावेळीं त्यानें ती मनीबॅग उघडली. तों त्यांतील ारीं ' ड्यूरेक्स ' चीं पाकीटं बाहेर पडलीं. तीं पाहून तो दचकला. याच्या नेत्रांत तत्क्षणीं आसुरी चमक चमकली.

अन् दाहक फूत्कार टाकीत त्यानें तेथून पाय बाहेर काढला.

*    *    *    *

बिचारी निर्मळा !

झाल्या प्रसंगानें अगदीं हतबुद्धच झाली ती.

स्वतःची केंविलवाणी अन् दुःखद अवस्था तिच्या मनाला जितक्या जास्त तीव्रतेनें जाचूं लागली, तितक्याच तीव्रतेनें तिला—

" समाजांत अद्यापि स्त्री म्हणावी तितकी सुरक्षित नाहीं. तिच्या ारिद्र्याचा अन् असहाय्यतेचा फायदा पुरुषवर्ग घेतल्याशिवाय हात नाहीं. "

—या वाक्याची सत्यता पटून येत होती.

*    *    *    *

त्या दिवशीं निर्मलेनें आपल्या डायरींत लिहून ठेवलें—

'...सुहास ? परित्यक्ता स्त्री ! कुठल्या पुरुषाच्या पाशांत सांप-डली ती ? सुहास, काय करते आहेस तूं ? तुला वासनांवर विजय संपादतां येऊं नये इतकी तूं मनदुबळी आहेस काय ? सुहास, असल्या ' डच्युरेक्स ' सारख्या किरकोळ साधनांनीं कां सुरक्षितता लाभणार तुला ? सुहास, भ्रम आहे तो तुझा; फसशील, हा मृगजळाचा मनोरम देखावा नाहींसा होईल. आणि मग एकादे दिवशीं तुला तुझ्या पापाचं ( ' **पाप** ' म्हणायचं का या कृत्याला ? मी ' पाप ' म्हणायला तयार नाहीं. पाप आाणि पुण्य—साऱ्या फोल कल्पना आहेत या ! पाप आणि पुण्य—जगांत या शब्दांचा भरणा कसा झाला असेल ? माणसांनींच नीतीचे नियम तयार करतांना पाप आणि पुण्य या शब्दांची खोगीर भरती वाढवली ना ? मग तीं निर्माण होण्यापूर्वीं पापहीं नव्हतें अन् पुण्यही नव्हतें हें उघडच आलें. आज तरी तिच्या या कृतीला पाप म्हणायला मला आधिकार कसा पोहोंचेल ? इतरां कुणाला तसं म्हणायचं असेल तर खुशाल म्हणूंद्यात. ) फळ तुला दिसून येईल अन् मग या अनुदारवृत्तीच्या स्वार्थपरायण जगांत जगायलादेखील तूं नालायक ठरशील. त्यावेळीं आत्मनाशाशिवाय तुला दुसरा मार्गच उरणार नाहीं.......'

* * * *

आणि सुहासनें लिहिलें—

'......मीं आज काय केलं ? माझ्या बंडखोरी प्रवृत्तीची आग शमवून घेतली. मला पैसा हवा आहे. पैशाच्या प्राप्तीचा हव्यास इतक्या प्रकर्षतेला पोहोंचला, कीं आज तेवढ्यासाठीं मी वाटेल तें करायला तयार झालें. कांचन ! कांचनाच्या दीप्तीपुढें जगालाही

दिपवून टाकण्याचं सामर्थ्य मनुष्याच्या अंगांत आहे. पण त्याच्या-जवळ कांचनाचा ढीग हवा. या कांचनाशिवाय सारं कांहीं फोल–तुच्छ आहे. मला आठवतं आहे, कुणीसं म्हटलं आहे—

“ गुणाला अवगुणाचा, गुण शून्यतेचा, कांचनरूपी जडतेचा बंदिवास पत्करावा लागला तेंही या **कांचनाचें** महत्त्व प्रस्थापित झाल्या-पासूनच.......जन्मसिद्ध हक्कांच्या, शिष्टसम्मत, सत्तासम्मत थोतां-डांच्या भरंवशावर श्रीमंत अधिकाधिक संपत्तिमान होत आहेत आणि गरीब अधिकाधिक भिकारी होत आहेत....**कांचनाचा** हा डोईजड डोलारा केव्हां कोलमडून पडेल तेव्हां पडो, पण आज त्याच्या प्रचंड ओझ्याखालीं असंख्य जीवांना जिवंतपणीं यमयातना भोगाव्या लागत आहेत हें मात्र खरें— ”

अगदीं खरं आहे त्यांचं हें तत्त्व.

या डोईजड डोलाऱ्याखालीं चिरडून गेल्यामुळें मला जिवंतपणीं प्रत्यही यमयातना भोगाव्या लागल्या म्हणूनच मी या मार्गाचा अव-लंब केला. मला पतीनें टाकलं, वासना उपभोगायला मिळाल्या नाहींत म्हणून या मार्गावरलीं कांटेरी लेणीं मी ल्यायलें नाहीं, तर मला पैसा मिळवायचा होता–या जिवंतपणींच्या यमयातनांचा मला नाश करायचा होता म्हणून ! आज मी पाप केलं असेन, समाजाच्या दृष्टीनं पापच आहे हें. पण हेंच पाप मी वैभवाच्या शिखरावर विरा-जेन तेव्हां लोक विसरून जातील. **वैभवाच्या पोटांत पापाला जागा नाहीं.**

## ४ हव्यास

ती वेळ रात्रीची होती. अंदाजे आठ—साडे आठ वाजले होते. टांग्यांची आवक जलद् अन् विशेष प्रमाणांत वाढत होती. बुकिंग ऑफिसच्या खिडकीजवळ माणसांचें मोहोळ उठलें होतें. पडघमच्या आवाजासारखा कर्णकटु आवाज कर्णरंध्रांत घुमत होता. रेल्वेलाईन-वरील लांब लांबच्या सिग्नलवर टांगलेले लाल दिवे पाहून—जणुं आपल्या आशा आकांक्षांची ठिणगीच पेट घेत आहे असं वसंताला वाटलं. प्लॅटफॉर्मवर प्रकाशाचा झोत तळपत होता. हमालांच्या हातगाड्यांचा खडखडाट, त्यांचे चीत्कार, अधिकाऱ्यांच्या हुकमी आवाजांतली कर्कशता—वसंताला आज साऱ्यांतली रंजकता अन् रम्यता लुप्तप्राय झाली आहे असं वाटत होतं. मोहळांतून उठलेल्या पिसाट माशांच्या

तुरळक तुरळक थव्यांप्रमाणें प्लॅटफॉर्मवर माणसांचे गट इतस्ततः दिसत होते.

एक जोडपं हातांत हात घालून फिरत होतें. सुंदर कमळाभोंवतीं काळाभोर भुंगा भुणभुणावा त्याप्रमाणेंच त्या गौरतनू युवती-बरोबर तिच्या हातांत हात अडकवून तो काळा सूट घातलेला बांधेसूद शरिराचा, सुदृढ प्रकृतीचा तरूण बेफिकीरपणें हिंडत होता. परागांतील मध चाखून धुंद झालेला तो भुंगा—

पाण्याच्या नळाभोंवतालच्या दगडी आळाजवळ तें जोडपें थांबलें. हातांतला हात सोडला. तो आंत नळाजवळ गेला.

वसंताच्या हृदयाला चरका बसला. तप्त भट्टींतून लोखंडाची लाल झालेली कांब नकळतपणें शरिराला स्पर्शावी अन् त्यायोगानें भाजून वेदना असह्य व्हावी, तद्वत वसंताला त्यांचा तो क्षणकालचा वियोग पाहून वेदना असह्य होत होती.

निर्मलेवर प्रेम केलं, मनापासून प्रेम केलं, पण चंचल वृत्तीची स्त्रीसुलभता आपल्या निदर्शनाला फार लौकर निर्मलेनें आणली असं त्याला वाटत होतं.

निर्मला ! नावांतली विसंगता जाचूं लागली त्याच्या मनाला. सांठवून ठेवलेल्या आशेच्या आरक्ततेंत वियोगाची—चिरवियोगाची—गढूळता सामावली. गालाच्या गुलाबी प्रवाहावर मत्सरमिश्रित मातीच्या गढूळतेनें करडा रंग चढविला होता. त्यांत नेत्रांच्या दाहक—विदारक—आरक्ततेची भर पडत होती.

अरण्यांतला पेटता वणवा ! पाहिल्याबरोबर मन भित्रं बनतं. भेसूरपणें भांबावतं—वसंताच्या चेहऱ्यांत याच साऱ्या भावांची गर्दी

एकवटली होती. त्याच्या चेहऱ्यावरील जळता भाव–नेत्रांतला दाह
फूत्कार–पाहाणाराच्या मनाला भयभीत केल्याशिवाय राहिला नसत
तो स्टेशनवर एकटा आला होता. बरोबर कुणालाही येऊं दि
नाहीं. जगाच्या प्रांगणांत मेलेल्या आशेशीं—मारलेल्या आकांक्षांच
पिशाच्चांशीं–झुंझायला निघालेला तो झुंझार–इतरांच्या सान्निध्याची
फुक्या फोलकट मायेच्या शब्दाची त्याला तमा नव्हती–जरूरी
नव्हती. ज्या मधुर आशेवर जीव विसांवून ठेवायचा, अमृताच
अथांग सागरांत असीम सुखानें पोहून तल्लीन व्हायचें तीच मधुर आ
जळून खाक झाली होती. विसांवणाऱ्या जीवाला हेलकाव्यांची तीव्र
क्षणांत गगनांतल्या तारकेचें, तर क्षणांत अधःपतित उल्केचें दर्श
घडवून आणीत होती. आणि अमृताचा अथांग सागर ए
लहानशा प्याल्यांतल्या–सृष्टीवर आक्रमण करूं पाहाणाऱ्या वीरा
नाश करायला समर्थ असणाऱ्या–दाहक हालाहलाप्रमाणें जीवनांती
अंतीम निराशता पटवून देत होता.

स्कार्फ गळयाला गुंडाळला होता. प्रेमनिराशेचा फांस काच
ळला आहे, असं त्याला वाटत होतं. त्यानें नेत्र विस्फारून चहूंक
नजर न्याहाळली. घड्याळाकडे दृष्टी गेली. अद्यापि गाडी याय
दहा मिनिटांचा अवधी होता. वाटलं, उठावं अन् घड्याळाचा कां
हातानें पुढें सरकवावा. पण कांटा सरकविल्यानें मार्गावरू
धांवणाऱ्या गाडीचा वेग वाढला असता थोडाच ?

मनाची नैराश्यता, आहाळता अन् व्यग्रता नाहींशी करण्याच्य
हेतूनें त्यानें चहाचा कप मागवला. तो कढत कढत चहा त्यानें घेतल
कढत चहाचा चटका जिभेला बसला. प्रेमाच्या निराशेच्या चटक्या

हृदय भाजून निघालें होतें. जिभेच्या चटक्याची स्मृति फार तर दोन अथवा तीन दिवस टिकून राहील, पण हृदयाला झालेल्या चटक्याची स्मृति—कायम—चिरंतन—राहाणार ! जिभेला चटका बसला त्याक्षणीं त्याच्या डोळयांत पाणी थरारलं. प्रेमाच्या शेवटच्या क्षणीं निरोपाचे अश्रू तरळले नाहींत ते आतां तरळत आहेत असं त्याला वाटलं. त्यानें रुमालानें पुसून काढले ते.

गाडी आली. उजाड ओसाड अन् भव्य वाड्यांत कसल्यातरी मोठ्या समारंभाची अचानक धांदल उडावी अन् त्या वाड्याला शोभा यावी तद्वत गाडीच्या आगमनानें तें स्टेशन विशोभित झालं होतं. पण स्मशानांत प्रेतसंस्कारासाठीं माणसांची गर्दी व्हावी अन् धडधडत्या चितेनें आसमंतांतील भाग व्यापून जावा तद्वत वसंताच्या मनाला त्यावेळचा देखावा भयत्रस्त करीत होता.

त्यानें आपलें सामान कसेंबसें डब्यांत फेंकलें अन् तो आंत शिरला. खिडकीजवळील कोपऱ्यांतील जागा रिकामी होती त्या ठिकाणीं जाऊन बसला. खिडकींतून बाहेर पाहात होता तो.

कांहीं वेळानें गाडीनें शिटी फुंकली. गाडीनें वेग वाढवायला सुरवात केली. हळूंहळूं स्टेशन मागें पडूं लागलं. वसंताच्या मनाला जरा हायसं वाटलं. त्यानें श्वास सोडला अन् स्टेशनच्या आवाराकडे शेवटची नजर टाकावी या हेतूनें तिकडे दृष्टी फिरवली.

निर्मला घाईघाईनें प्लॅटफॉर्मवर येत होती.

अद्यापि गाडीनें सगळा प्लॅटफॉर्म ओलांडला नव्हता. निर्मला धावूं लागली. वसंताला स्पष्ट दिसलं तें. पण—त्यानें आपलें डोकें खिडकींतून आंत काढून घेतलें.

बिचारी निर्मला !

वसंताचा चेहरासुद्धां तिला दिसला नाहीं.

हताश अन् खिन्न मुद्रेनें ती परत फिरली.

* * * *

तीच वेळ:—

एका ल्हानशा पण निरनिराळया मोहक वस्तूंनीं नटविलेल्या टुमदार खोलींत एक चोवीसच्या उमरीचा, भेदक नजरेचा, मोहक पण सौष्ठवपूर्ण सुदृढ शरिराचा, अद्यावत् पद्धतीच्या कपड्यांनीं अन् इतर पेहरावांनीं विलसविलेल्या अवखळ–यौवनमध्यस्थ अंगाचा तरुण कोचावर बसला होता. समोरच्या खुज्या टेबलाजवळ केशरी दुधाचा कप हातांत घेऊन एक–केळीच्या खुंटांतल्या आंत आंतल्या पापुद्र्यासारख्या गोऱ्या अंगाची, सडपातळ शरिराची, बारीक कटीची, नितळ उटीपोटाची, त्रिवळीच्या रक्तवर्ण नाभीची, रेखीव अवयवाची, उन्नत टचटचीत उरोजाची, मोहक चेहऱ्याची, नाचऱ्या नजरेची, विशाल भालेची, विपुल केसांची, विलोभनीय सौंदर्याची खाण–अंदाजें एकवीस वर्षे उमरीची–तरुणी उभी होती. तिच्या पायांत पैंजण होते. कमरेला सोन्याचा कमरपट्टा होता. गळयांत मोत्यांचा एक-सर होता. कानांत निळया–चकाकणाऱ्या कांचेचे लोलक लोंबत होते. एकाद्या मौल्यवान् हिऱ्याचें सौंदर्य अती कुशलतेनें खुलविलेल्या कोंदणांमुळें द्विगुणित व्हावें त्याप्रमाणें तिच्या गोलदार, स्मितयुक्त मोहक चेहऱ्याचें सौंदर्य त्या लोलकामुळें द्विगुणित होत होतें.

त्या तरुणानें तिच्या हातांतला पेला मोठ्या लालित्यपूर्ण कसबीनें घेतला. एक गोड हास्य केलें अन् नंतर ओंठाला लावला.

प्रीतीच्या आवेशाच्या मादक आव्हानांत तो विलीन झाला.

त्यानें तिला पद म्हणण्याची विनंति केली.

तिनें पालथी मांडी घातली. अन् पद म्हणण्यास सुरवात केली.

**हृदयाचें दान आम्ही**
**एकाशींच करूं नितंबिनी ॥ ध्रु० ॥**
**एकचि गोडि; एकचि प्रेम**
**एका हृदयीं एकचि अर्पूं**
**दर्पणीं जैसे प्रतिबिंबचि हो ॥ १ ॥**

स्तब्धतेचा भंग सुरेल अन् उन्मादी आवाजानें केला.

ठाय कमी होत होती. लय वाढत होती.

हृदयावरचा ताबा नाहींसा होत होता. प्रमाथी लहरी उसळत होत्या. वृत्ती बहीरून धुंद झाल्या होत्या. नेत्रांत मादक धुंदता सामावली होती.

चारुतेची भुरळ असामान्य आहे; त्यांत संगीताची भर !

उगवत्या कमळांची चारुता, सभोंवारच्या शांत पाण्याची संमोही–शीतलता, हंसाचें कूजन, भुंग्यांचें संगीत–सारेंच वातावरण कसें सुधेप्रमाणें मधूर अन् मदिरेप्रमाणें मादक असतें–तद्वतच त्या खोलींत मधुर अन् मादक वातावरणाची धुंदता एकवटली होती.

तिच्या तोंडून स्वर बाहेर पडत होते—

नेत्रांतून शर सुटत होते—

त्याच्या काळजाला भिडत होते—

संगीताच्या मादक माधुरीनें त्याचें मन मुकें बनलें होतें.

त्या मुक्या मनांनीं परस्परांतला परकेपणा मुक्यानेंच नाहींसा केला.

कणखर झाडाला नाजुकशा वेलीचा घट्ट विळखा बसला.

* * * *

तो तरुण म्हणजे विभाकर आणि ती तरुणी म्हणजे रत्ना !

विभाकर म्हणजे एक रंगेल रसिक तरुण. खावें प्यावें विलासांत मस्त व्हावें ही त्याच्या मनाची मस्त हांव. त्याच्या साऱ्या वृत्ती सदा विलासासाठीं भुकेलेल्या असायच्या.

चैनीसाठीं—विलासासाठीं तो कधीं कुणाची पर्वा करीत नसे.

रत्ना एकदां निर्मलेकडे आली होती. तिनें विभाकराला पाहिलें. तिच्या मनाचा तोल गेला. कमळाच्या नाजूक पाकळ्यांच्या चुंब-नांनीं शरिराच्या साऱ्या रोमरोमांना गुदगुल्या व्हाव्यात अन् वृत्ती मोहरून जाव्यात, तद्वत त्याच्या दर्शनाबरोबर रत्नाच्या साऱ्या शरिरावर सुखद, उन्मादी अन् प्रमाथी लहरींचे रोमांच विलसले.

आधींच विलासाला भुकेलेला विभाकर, त्यांत रत्नासारख्या सौंदर्यखनीच्या प्रीतीच्या आवेशाचें मादक आव्हान !

पण त्यांतही अतृप्तता !

विलासप्रीय माणसाची विलासाच्या अतिरेकांतही तृप्तता होत नाहीं. तीच तऱ्हा विभाकराच्या वृत्तीची.

रत्नाचें सौंदर्य वृत्तींना धुंद करी, तर सुहासाचें मादक सौष्ठव सुप्तशक्ती जागृत करी.

दोहींची असीम पकड त्याच्या विलासप्रीय मनाची व्यग्रता वाढवी.

रत्नाच्या सान्निध्यांत धुंद वृत्तींची तृप्तता होई, पण ती अपुरी वाटे त्याला.

जशी रत्ना चालून आली त्याच्याकडे.

तशीच सुहासही आली त्याच्याकडे.

पण रत्नाच्या आगमनांत अन् सुहासच्या आगमनांत फरक होता. विभाकरानें तो लक्षांत आला असूनही आलासें दर्शविला नाहीं.

विलासप्रिय विभाकर तेवढ्यासाठीं–विलासाच्या तृप्तीसाठीं–वाटेल ते श्रम घ्यायला तयार झाला.

विलासाचा हव्यासी विभाकर !

वैभवाची हव्यासी सुहास !

वैभवाच्या प्राप्तीसाठीं वाटेल तें करायला तयार झालेली सुहास !

विलासाच्या तृप्तीसाठीं वाटेल तें श्रम घ्यायला तयार झालेला विभाकर !

* * * *

बिचारी निर्मला !

स्टेशनवरून घरीं आली.

खोलीचं दार उघडलं, वळकटी पसरली, अंग टाकून दिलं, रडली खूप रडली. अंथरुणाचा उशालगतीचा भाग भिजून ओला चिंब झाला.

'लग्न करायचें नाहीं' असल्या अविचारी भलत्या प्रतिज्ञेला भरीं पडून कांहींकाल प्रीतीला चाळवलें. मनाला मारणारा मुका लपंडाव कांहीं काळ खेळून पाहिला, पण प्रीतीच्या हव्यासाची तीव्रता तो खेळ पुढें चालवूं देईना. असह्यता जाचवूं लागली. निश्चयाला मूठमाती दिली. प्रीतीच्या प्रांगणांत उतरली. प्रीतीची मादक गंध–सुगंध फुलें खुडलीं. पण लागलीच तीं कोमेजलीं—करपलीं.—!

वसंत गेला ! हृदय विदारून गेला.

प्रीतीचा हव्यास तीव्र झाला !



## ५ भूक

वसंतानें नव्या जगांत पाऊल ठेविलें. सारंच कांहीं नवीन.

ते गोड चीत्कार, निरागस हास्य, निरपेक्ष पण भुलभुलावणाऱ्या नजरा, या साऱ्यांचा अभाव तिथें होता.

मळकट कपड्यांचा, बुरसटलेल्या चेहऱ्यांचा अफाट जनसमूह रोज त्याच्या नजरेपुढें आठ तास राबे. साऱ्यांच्या चेहऱ्यावर निराशेची आहाळता, समाधानाची अतृप्तता अन् भुकेली आर्तता स्पष्ट दिसे.

बिचाऱ्यांनीं घाम गाळावा, कष्ट करावेत अन् त्यांवरील मिळकत लाटावी मालकवर्गानीं !

वसंताला येऊन आठ दिवस झाले होते.

तो रोज पाहात होता तें सारं आणि मनाशीं विचार करीत होता.

मॅनेजर काय काम करतो, जॉबर काय काम करतो, मास्तर काय काम करतो आणि मजूर काय काम करतो ?

वशिलेबाजीची बजबजपुरी माजलेली दिसली.

ज्याला साधा साचाही चालवायला येत नाहीं तो जॉबर–हेडजॉबर म्हणून मिरवतो – गुरमींत वागतो. बदलीवाल्याकडून दारूच्या बाटल्या घेतो. स्त्री-मजुरांच्या घोळक्यांत हिंडतो – मध्येंच मिस्किलपणें हंसतो—एकीला बढती देतो—एकीला कामावरून काढून टाकतो–असे एक कां दोन; कितीतरी प्रसंग अन् हृदयविदारक दृश्यें त्याला दिसत.

काम नाहीं म्हणन ज्यांना आपल्या पोटाला चिमटा घ्यावा लागतो, त्यांना काम मिळावं म्हणून, आणखी चिमटा घेऊन, ज्यांचं तोंडही पाहायची लायकी नसते अशांचे पाय धरून त्यांच्या हातावर चिरीमिरी देऊन केंविलवाण्या अन् आशाळभूत नजरेनें पाहात पायांचे तुकडे पडेपर्यंत हेलपाटे घालावे लागतात.

चिरीमीरीसाठीं पैसा, खुशीसाठीं बाटल्या अन् प्रसंगीं— ! ! त्याच्यासमोर प्रत्यक्ष घडलेला एक प्रसंग उभारला—

सार्जा ! वयानें बावीस तेवीस वर्षांची ! रुपानें बऱ्यापैकीं असलेली. सुदृढ बांध्याचीं गोजिरवाणी पोर ! घरचें अठराविश्वें दारिद्र्य ! नवरा कर्जबाजारी. त्यांत त्याला दारूचें व्यसन ! तिनें त्याला पुष्कळ वेळां सांगून पाहिलें, पण त्याचें दारूचें व्यसन सुटेना ! बाहेरच्या जीवघेणी जाचाला विस्मृतीचा विळखा पडावा म्हणूनच

मी हें पाणी–ताडी–पोटांत ढकलतों–असं कांहींसं तो उत्तर देई ! तिचा नाइलाज होई. ती स्वस्थ राही. सारं दुःख आंतल्या आंत गिळे.

आवकची तोटी एक पण जावक मात्र हजार तोट्यांची ! खर्चाची तोंडमिळवणी अशक्य होऊं लागली. अन् अखेरीस गिरणींत कामाला यायचा तिनेंही निश्चय केला.

कांडी खात्याच्या मुख्य बाईला भेटली. तिनें तिला कायसेसें सांगितलें. ती बाजूला उभी राहिली. थोड्या वेळानें मास्तर आले. त्या मुख्य बाईनें मास्तरला बोलावलें–बाजूला नेलें–सार्जाकडे बोट करून त्याला तिनें कांहींतरी सांगितलें.

सार्जाला वाटलें, आपली शिफारस करते आहे. तिच्या आशाळ-भूत नजरेंत आशेचा झोत प्रकाशला.

त्यांची कुजबूज चालूंच होती.

" फाकडू पाखरूं हाय बघ ! बोल, किती देशील ? "

" देईन दोन ! आन् वर तिला काम बी ! "

त्यांचा सौदा ठरत होता. माल एकाच्या मालकीचा. सौदागर दुसराच. अन् घेणारा तिसराच !

असली किळसवाणी देवाण घेवाण !

वसंताला शिसारी आली. पण रोज नित्य तेंच तेंन् तेंच तें !

गटारें उपसणाऱ्यांनीं नाकाला पदर लावून कसें चालेल ?

त्याच किळसवाण्या खाईत त्यालाही काम करायचें होतें. रोज तो सारं कांहीं पाहायचा, पण डोळ्यांवर कातडं ओढून वागायचा. 'ब्र' काढायला वाव नाहीं. फट् म्हणतां ब्रह्महत्या व्हायची !

मॅनेजरच्या शेजारच्या खोलींत त्याची खोली होती. तिथं त्याला आपलं सारं कांहीं कामकाज पाहावं लागे. एकदां तो एकटाच होता. मॅनेजरही अद्याप कामावर आले नव्हते. इतक्यांत एक तरूण आंत आला. त्याच्या बोलण्याचालण्यावरून तो चांगला शिकलेला अन् उच्च वर्णाचा असावा असं वसंताला वाटलं. त्यानें त्याच्याकडे प्रश्नार्थक मुद्रेनं पाहिलं.

त्या तरुणानें केविलवाण्या नजरेनं त्याच्या दृष्टिशीं दृष्टि भिडवली.

"काय काम आहे ? अन् इथंपर्यंत सोडलं कुणी तुला ?" त्यानें विचारलं.

तो स्वस्थच उभा. सांगूं कीं नको या घोटाळयांत तो असावा.

वसंतानें ताडलं, दारावरच्या पहारेकऱ्याचं कृत्य आहे हें ! हात ओला झाला असेल बेट्याचा—

"काम नाहीं. मी शिकलेला आहे. कुठंतरी कारकुनाच्या जागेवर–" त्याला हुंदका दाटून आला. पुढें बोलवेना त्याला.

"माझ्या हातांत कांहीं नाहीं. तूं थोरल्या साहेबांना भेट." वसंतानें त्याला सांगितलें.

"साहेब, तुम्हीच वशिला लावा तेवढा ! तुमचे पाय धरतो–हें पहा–" असं म्हणून पांचाची नोट त्याच्या पुढ्यांत ठेवली अन् खरोखरीच त्यानें त्याचे पाय धरले.

वसंतानें त्याला उठविलं. त्याच्या हातांत ती नोट परत दिली. अन् सौम्य शब्दांत त्याची समजूत घालून त्याला पिटाळलें.

ज्याला काम नाहीं, खायला मिळत नाहीं–पोटाची पंचाईत, तो दुसऱ्याला पांच रुपये देण्याइतका समर्थ कसा ? वसंताला हें कोडें सुटेना !

तसाच आणखी एक प्रसंग.

त्या बाईला बढतीची हांव होती. कांहीं केल्या मिळेना—अखेर ती जवळपास कोणी नाहीं असं पाहून वसंताजवळ आली अन् बढतीची याचना करूं लागली.

वसंतानें तिला चक्क नकार दिला.

पण ती कांहीं केल्या ऐकेना.

पलीकडून बायकांचा घोळका चालला होता.

क्षणभर वसंताची दृष्टी तिकडे फिरली. त्यांतल्या एकीवर स्थिरावली. ती तशीच देखणी होती.

तिला वाटलं हाही साहेब त्यांतलाच !

तिनें निर्लज्जपणें बोलून दाखवलं—"आणूं काय साहेब तिला आपल्या घरीं आज ?"

वसंताला तिचा राग आला. त्यानें तिला घालवून दिलें.

सारीच बजबजपुरी माजलेली दिसली त्याला ! या बजबजपुरीचा जन्म कशांत झाला असेल बरें ?

तो विचार करी. अन् अखेरीस निर्णय होई, कीं—

"वासनांची अन् भुकेची अतृप्तता."

*      *      *      *

निर्मलेची आठवण होई. मन आहाळून जाई. पण पुन्हां तो तें सारं दुःख विवेकानें, आवेगानें दडपे.

सिनेमागृहांत अंधारांतच पडद्यावर चित्रांची हालचाल होई.

मनाच्या पडद्यावरही निवांतवेळीं—अंधारांतच स्मृतीच्या चित्रांची हालचाल होत असे.

स्मृतीच्या चित्रपटांनीं त्याचं शरीर क्षणकाल फुलकित होई. अत्तरगुलाबाचा शिडकाव केलेल्या ताज्या फुलांच्या गार सुखद स्पर्शासारखं वाटे नी सारं शरीर रोमांचित होई. पण लागलीच त्याच्या डोळ्यांपुढें तीं बॅगमधील पाकिटें दिसत अन्...अन्...

पुन्हां त्याला निर्मलेची निर्वाणीची–निश्चयाची वाणी आठवे. तिच्या नेत्रांत सामावलेली केविलवाणी दुर्बलता–ते हताश अश्रू–सारं सारं कांहीं आठवे अन् मन साशंकित होई.

सकाळची वेळ होती. तो स्नानगृहांतून बाहेर आला. कपडे घालूं लागला, इतक्यांत पोष्टमननें पत्र आणून टाकलें.

तें पाकीट होतें. सुहासकडून आलें होतें.

त्यानें फोडलें अन् वाचण्यास सुरवात केली.

निर्मलेवर आपण व्यर्थ रागावलों असं आतां वसंताला वाटूं लागलं. त्याची दृष्टी पश्चात्तापानें अवनत झाली.

* * * *

सुहासनें बऱ्याचशा गोष्टी छपविल्या होत्या. पण एवढें मात्र कबूल केलें, कीं त्या साऱ्या वस्तू स्वतःच्या आहेत. निर्मलेचा त्याच्याशीं काडीइतकाही संबंध नाहीं. वसंतानें तें पत्र पुन्हां एकदां वाचलें.

आणि तत्काळ त्यानें क्षमेच्या मजकुराचें पत्र निर्मलेला पाठविलें.

पण निर्मलेनें झालेल्या अन्यायाचें उट्टें काढायचें ठरविलें. तिनें त्याला उत्तरच लिहिलें नाहीं.

हा वेळ पात्रेतों निर्मलेची अवस्था केविलवाणी झाली होती, आतां वसंताची अवस्था केविलवाणी झाली आहे. तिच्याकडून पत्र येईल, आपण केलेल्या अविचारी अन्यायाचें तिच्याकडून परिमार्जन होईल, अशी त्याला आशा होती. पण तिच्याकडून उत्तरच येईना तेव्हां त्याचें मन अत्यंत उद्विग्न अन् खिन्न झालें. त्यानें आणखी एक कळवळून पत्र लिहिलें. त्यांत तिची पुन्हःपुन्हां क्षमा मागितली. परंतु त्याचेंसुद्धां उत्तर आलें नाहीं, तेव्हां तर तो अतीशयच अस्वस्थ झाला. त्यानें कशीबशी परवानगी मिळविली अन् धांवत परत निर्मलेला भेटायला निघाला. निर्मलेच्या भेटीसाठीं तो अधीर झाला होता.

* * * *

गाडी सुटायला फक्त दोनच मिनिटें अवकाश होता. स्टेशनवर प्रवाशांची बरीच धांदल उडत होती. रेल्वे पोलिसांच्या चकरा इकडून तिकडे होतच होत्या. हमालांच्या घाईला ऊत आला होता. मिळेल त्या जागेंत घाईनें डोक्यावरील ओझें फेंकून देण्यांत ते सारे गर्क झाले होते अन् मिळेल त्या जागेंत लौकर येऊन बसण्यांत प्रवाशांची धांदल होत होती.

साधारण बावीस वर्षे वयाचा तरुण धांवत धांवत आला. डब्यांत चढला आणि एका कोपऱ्यांत जाऊन बसला. पळत आल्यानें त्याला बराच दम लागला होता.

वसंतानें त्याच्याकडे पाहिलं अन् आश्चर्यानें त्याला विचारलं—

'अरे तूं इकडं कुठं !'

त्यानेंही वसंताकडे नजर वळविली.

'गाडी सुटूं दे ! मग सारं कांहीं सांगेन.' त्यानें उत्तर दिलं.

त्या तरुणाचं नांव हिमांशु ! चेहऱ्यावर करारीपणा स्पष्ट दिसत होता. नेत्रांत असामान्य चमक होती. अंगावरील व जवळीलही कपडे पूर्ण स्वदेशी होत. शरिरानें धट्टाकट्टा अन् धिप्पाड मजबूत बांध्याचा तो होता. वर्णानें काळासावळा होता. बोलण्यांत गोड अन् पाल्हाळिक, पण त्यांतही आकर्षकता अन् मोहकता जास्त होती.

त्यानें आपली बरीचशी माहिती वसंताला सांगितली. वसंतानेंही आपली माहिती त्याला सांगितली. शाळेंत चौथ्या इयत्तेपासून ते मॅट्रिकपर्यंत ते दोघे एका वर्गांत शिकलेले होते. पण नंतर जी त्यांची फाटाफूट झाली ते त्यानंतर आतांच एकमेकांसमोर अचानक-पणें उपस्थित झाले. वसंताला त्याला पाहिल्याबरोबर त्याच्या स्मृतिबद्दलचा कुठला एक विशिष्ट प्रसंग जर एकदम आठवला असेल, तर सहाव्या इयत्तेंत असल्यावेळेचा—

सर्व हिंदुस्थानांत महात्मा गांधींनीं सुरू केलेल्या सत्याग्रहाचीं लाट त्यावेळीं उसळली होती. शाळा–कॉलेजें यांवर सारखे संप पुकारण्यांत येत होते व ते थोड्याबहुत प्रमाणांत यशस्वीही होत होते.

सोलापुरांत मॉर्शल लॉ पुकारला होता त्यानंतरचे ते दिवस होते. अन् तेव्हांपासून शाळेंत येतांना कोणीही खादीची टोपी घालून येऊं नये असा हेडमास्तरांनीं सक्त हुकूम फर्मावला होता.

सोलापुरचे डॉ. अंत्रोळीकर, रामभाऊ राजवाडे हे त्यावेळीं फरारी झालेले होते. सरकार त्यांच्या पाळतीवर होतेंच.

अचानकपणें एकदां रामभाऊ राजवाडे सोलापुरांत आले. त्यांचं टिळक चौकांत व्याख्यान झालं. तरुणांच्या रक्तानें उसळी मारली पुन्हां.

दुसऱ्या दिवशीं रामभाऊ राजवाड्यांच्या दरवाजांत सकाळीं नऊ वाजतां पोलिसांची तुकडी हिमांशुला दिसली. तो तिथंच उभा राहिला. चौदापंधरा वर्षांचा पोर तो. पण मोठ्या धैर्यानें त्यानें पोलिसाला प्रश्न विचारला. त्या पोलिसानें संदिग्ध उत्तर दिलें.

रात्रीं तो व्याख्यानाला गेला होताच.

त्यानें कसलासा निर्धार केला. तो परत घरीं गेला. महत्प्रयासानें त्यानें त्याच्या मावशीनें दडविलेली खादीची टोपी शोधून काढली. ती टोपी घालून तो कितीतरी वेळां साऱ्या सोलापुरांतून अभिमानानें मिरवला होता. पण मॉर्शल लॉ च्या वेळीं भयप्रकर्षानें त्याला ती टोपी दडवावी लागली. त्याला त्या टोपीच्या दर्शनाबरोबर टोपी घालून मिरवलेला तो शेवटचा दिवस आठवला.—

दुपारीं तीनचा सुमार होता. नामदेव चिवडेवाल्याच्या दुकानाजवळ जमलेल्या अफाट जनसमूहांत तो उभा होता. ज्याच्या त्याच्या तोंडीं ‘ कोर्टाला आग लागली–कोर्टाला आग लागली ’ असा विषय बोलला जात होता. तितक्यांत–‘ पळा पळा ’ असा भीतियुक्त आवाज ऐकूं आला, अन् वाट सापडेल तिकडे जो तो धांवूं लागला. मागून सूं सूं सूं आवाज करीत‘ गोळया झाडीत मोटर येत होती. चिवड्याच्या दुकानच्या फळीखालीं तो दडला. शेजारच्या झाळ देणाऱ्या दुकानचा पत्रा त्यानें आपल्या पुढें धरला. तो सायंकाळीं सहा साडेसहालाच तेथून बाहेर पडला.—

ती टोपी मळलेली होती. पण धुवायला वेळ नव्हता. रात्रींचे राजवाड्यांचे भावना हेलावणारे उद्गार त्याला डिवचीत होते. त्यानें तशीच ती मळकी टोपी डोक्यावर चढवली. पारतंत्र्यानें मायभूच जिथें मलीन झाली आहे. अन् तिला सोडविण्यासाठींच जिथें अहोरात्र श्रमावयाचें आहे तिथें मळक्या टोपीची क्षिती बाळगून कसें चालेल, असाच कांहींसा विचार त्याच्या मनांत त्यावेळीं आला असेल. तो ती टोपी घालून शाळेंत आला.

शाळेचा सक्त हुकूम मोडल्याबद्दल त्याला वर्गशिक्षकानें वर्गाच्या बाहेर होण्याला फर्मावलें. त्यानें कारण विचारलें. शिक्षकांनींही त्याला कारण सांगितलें. त्या शिक्षकांचें नांव होतें मळेकर. फार प्रेमळ पण कडक शिस्तीचे—सत्याचे भोक्ते होते ते. त्यानें वर्गाच्या बाहेर जाण्याचें आणि टोपी काढण्याचेंही नाकारलें. छडीची शिक्षा केली. त्यानें हसंतमुखानें भोगली. अखेर नाइलाज झाल्यावर हेडमास्तरांची परवानगी आण आणि मग वर्गात बैस असें शिक्षकानें सांगितलें. तो हेडमास्तरकडे गेला. हेडमास्तर त्याच्या कृत्याला अनुकूल होते, पण ते तशी लेखी चिठ्ठी देईनात व स्वतःही येईनात. तो परत आला. त्यानें त्यांची अनुकूलता बोलून दाखवली, पण लेखी नसल्यानें मास्तरानें तें नाकारलें. तोही हट्टाला पेटला. तेवढ्यांत तास संपला. मास्तरांनीं त्याला बरोबर घेतलें अन् हेडमास्तरकडे नेलें. हेडमास्तरांनीं तेवढा वेळ क्षमा करा असं सांगितलं व पुन्हां उद्यांपासून ही टोपी घालून येऊं नकोस असं बजावलं.

आजच्यापुरता तरी विजय झाला या आनंदानें तो परत आला. हाच प्रसंग वसंताला आठवला होता.

मध्यंतरी त्या दोघांची हलक्या आवाजांत काय कुजबूज झाली कोण जाणे, पण निर्मलेला भेटायला निघालेला वसंत पुण्यालाच उतरला आणि सरळ हिमांशुबरोबर हिमांशूच्या खोलींत शिरला.

* * * *

सायंकाळचे सहा साडेसहा वाजले असतील. निर्मला आज कुठेंच बाहेर गेली नाहीं. ती आपल्या खोलींत कालिदासाचें ' कुमार-संभव ' वाचीत होती. वाचतां वाचतां तिच्या डोळयांत पाणी थरारलें. तिनें हातानें डोळे पुसले. ती कामदेवाच्या दग्धतेनंतरच्या रतिविलापावेळेच्या श्लोकाचा अर्थ लावीत होती.

**" शशिना सह याति कौमुदी**
**सह मेघेन तडित् प्रलीयते**
**प्रमदाः पतिवर्त्मगा इति**
**प्रतिपन्नं हि विचेतनैरपि ॥ "**

तिच्या अश्रूंनीं डबडबलेल्या नजरेपुढें वसंताची मूर्ति उभी राहिली. तिला वसंताचा भास झाला होता ! तिनें डोळे पुसले अन् पुन्हां एकदां समोर पाहिलें, अन् नंतर तिची खात्री झाली, कीं तो भास नव्हे, प्रत्यक्ष वसंतच समोर उभा होता.

तिची सारी म्लानता विलयाला गेली. दुःखाश्रूंनीं डबडबलेल्या नेत्रांत आनंदाश्रु तरळले. स्मितानें स्वागत केलें अन् हात धरून त्याला जवळ ओढलें.

* * * *

" अशक्य आहे तें. "

" पण कां ? "

" ज्यावेळीं ' ही वस्तू माझी, ही वस्तू तुझी ' असा विचार मानवांत उत्पन्न झाला त्यावेळेपासून मालकी हक्काची जाणीव दृढावत गेली. या मालकी हक्काच्या जाणिवेबरोबरच सुरक्षिततेसाठीं—चिरंतनासाठीं—वारसाहक्काचीही जाणीव मनांत रुजली. वारसाहक्काची प्रस्थापितता व्हावी यासाठीं ' आपलें ' म्हणून सांगायला सुलभ जाईल असें माणूस निर्माण करण्याची आवश्यकता वाटूं लागली. या आवश्यकतेंतूनच विवाहसंस्था निर्माण झाली आहे. ही विवाहसंस्था नष्ट करण्याच्या पंथाची मी दीक्षा घेतली आहे. आज फक्त तुझ्याजवळच मी हें बोलून दाखवीत आहें. इतरांजवळ हे विचार व्यक्तविण्यासारखे नाहींत. अन् तूंही पण याची वाच्यता इतक्यांत कुठें करूं नकोस. ज्या समाजाच्या आवश्यकतेंतून या विवाहसंस्थेचा जन्म झाला, त्या या समाजाच्या आवश्यकतेंत ज्याप्रमाणें बदल घडवून आणावासा वाटेल. अथवा ती संपूर्णपणें नाहींशीं करावीशी वाटेल त्याप्रमाणें या विवाहसंस्थेचाही बदल अथवा नाश होईल. आम्हांला या दोन्हींपैकीं कांहींतरी एक करावयाचें आहे. मात्र तें असें, कीं ज्यायोगें आजच्यापेक्षां समाज जास्त सुखी अन् उन्नत्त होइल असेंच कृत्य. " तो आवेशानें बोलत होता. ती मुकाट्यानें ऐकत होती. तिला तें पटत होतं. पण तिचं अंतःकरण विदारलं जात होतं त्या उद्गारांच्या श्रवणानें. तिला स्वतःच्या दुःखापेक्षां त्याच्या विषयींच्या कल्पनेचं दुःख जास्त वाटत होतं. ती भयचकित स्वरांत म्हणाली—

" म्हणजे ? तूं साम्यवादी संघांत सामील झालास कीं काय ? "

" होय ! " निश्चयपूर्ण स्वरांत त्यानें उत्तर दिलें.

" पूर्ण विचार केला आहेस ? " ती कळवळून म्हणाली.

" अर्थात् ! "

हा सारा संवाद वसंताला पुन्हां पुन्हां आठवत होता. आणि त्या आठवणीबरोबरच त्याचें विचार–चक्रही फिरूं लागलें.

संपत्ति ! सुखाला पोखरणारी संपत्ति ! ही संपत्ति आज एकाद्या-जवळ अडगळासारखी पडली आहे तर कित्येकांना तिचें दर्शनही दुर्लभ झालें आहे. संपत्तीच्या दर्शनाला दुर्लभ झालेला समाज संख्येनें जास्त आहे. पण हतबल आहे. संपत्तीच्या पोटांत साऱ्या शक्तींची एकवटता आहे. ही शक्ती दुसऱ्याला मारते आहे. ही मारणारी–असमाधानाची प्रेरणा करणारी संपत्तीच नाहींशीं झाली तर ? पण ती ज्यांच्या हातांत आहे ते ती सोडतील कां ? छे–भांडवलशाही !–या भांडवलशाहीचा जन्म खासगी मालमत्तेंतून झाला असावा. या खासगत मालकीच्या समाजरचनेचा–भांडवलशाहीचा शिरच्छेद केला पाहिजे. तेवढ्यासाठीं वर्गकलहाचें शिरकाण ! ही भांडवलशाहीच आज समाजांत माजलेल्या आर्थिक विषमतेच्या भुताला अन् त्यापासून होणाऱ्या अनर्थाला कारणीभूत झाली आहे–होत आहे. कामकऱ्यांनीं अन् शेतकऱ्यांनीं रक्त आटवायचें अन् त्या आटलेल्या रक्ताचा मेवा खाऊन लालबुंद व्हायचें या भांडवल-दार परतभृतांनीं ! या परभृतांच्या मोटारगाड्या किंबहुना सर्वत्र सृष्टीचा व्यवहार केवळ आपल्या श्रमावर चालतो–श्रमांमुळें निर्माण होणाऱ्या उत्पादन–वस्तूंवर चालतो हें श्रमजीवी शेतकरी अन् काम-करी वर्गानें ओळखायला हवें–अन् त्यांनींच स्वयंप्रेरणेनें या

साऱ्यांचा उच्छेद करण्याचें ठरवून क्रान्तीचें निशाण फडफडविलें पाहिजे. आमच्यासारख्यांनीं नाचून कांहीं व्हायचें नाहीं. व्हायचें असेल तर तें एवढेंच होईल, कीं त्या श्रमजीवी कामकरी शेतकरी वर्गांत जागृति. खुद्द श्रमजीवी वर्गांनीं पुढाकार घेतल्याशिवाय अन् प्रत्यक्ष कार्याला सुरवात केल्याशिवाय समाजांत बजबजलेली खासगी मालकीची श्रीमंती नाहींशीं होणार नाहीं. अन् तसं जोंपर्यंत होणार नाहीं तोंपर्यंत सुखसमृद्धीची आशा नाहीं. श्रीमंती नाहींशीं झाली पाहिजे म्हणजे आपोआपच वारसाहक्काचीही कल्पना नाहींशी होईल. वारसाहक्काच्या कल्पनेबरोबर विवाहाची कल्पना, विवाहाच्या कल्पनेबरोबर धर्म, धर्माच्या कल्पनेबरोबर प्रचलित नीति—साऱ्या साऱ्या समाज संस्थेला प्राणांतिक धक्के बसणार—आणि बसले पाहिजेत. ज्यांच्यामुळें हें घडून येईल असं मला वाटतं त्या श्रमजीवी शेतकरी कामकरी वर्गाच्या नंतर होणाऱ्या प्रत्यक्ष व्यवहारांतून—देवाणघेवाणींतून जी उत्क्रांति दिसून येईल, त्या उत्क्रांति काळांतील समाजांत नव्या संस्था, नवी नीति, नवा धर्म निमाण होईल. आणि तेंच सारें मानव जातीच्या सुखसमृद्धीला पोषक होईल.

* * * *

विभाकराचें तें वाक्य रत्नाच्या हृदयांत कुजलेल्या कांट्यासारखें खोल रुतून बसलें. वेदना असह्य झाल्या. ती सारखी रडत होती. अश्रूंच्या ओघळणाऱ्या सरींनीं उशालगतचा भाग भिजून गेला.

आजचा हा दुःखाचा प्रसंग आणि दोनच दिवसांपूर्वीं उपभोगलेला हर्षाचा प्रसंग ! हे दोन्ही प्रसंग तिच्या डोळ्यांपुढें उभे राहिले.

दोन दिवसांपूर्वींचा तो प्रसंग तिच्या मनश्चक्षूंपुढें उभा राहिला—

सायंकाळची साडेचार वाजण्याची वेळ होती. विभाकर तिच्या घरीं आला होता. रत्ना नुकतीच झोंपून उठली होती. तिनें तोंडावरून पाण्याचा हात फिरवला. केस नीट साफसूफ केले. अन् चहा करण्यासाठीं स्टोव्ह पेटवला. विभाकर आल्यानंतर तिनें त्याच्यासाठींही पाणी ओतलें. चहा घेतांना रत्ना म्हणाली—" आज इतक्या लवकर जायचं टेनिसला ? "

" छे; टेनिससाठीं आलोंच नाहीं मी ! आज आपण बोटिंगला जाऊं ! येशील ना ? " विभाकरानें तिला विचारलें.

" बोटिंगला ? आणि परत केव्हां यायचं ? " तिनें विचारलें.

" येऊं लवकरच ! फार वेळ नाहीं बसायचं, पण निदान थोडा वेळ तरी चकरा मारूं."

" बरं तर ! पण मला नीटसं बोटिंग येत नाहीं हं; तुम्हांलाच ते सारे श्रम घ्यावे लागतील." ती बजावीत होती.

त्यानें कबूल केलें.

रत्नानें पातळ बदललें. केशरी रंगाचें तलम जॉर्जेटचें पातळ विकच्छ पद्धतीनें तिनें पेहेरलें. अंगांत तोकडा बिनबाह्यांचा निळसर रंगाचा व्हेस्ट घातला. तोंडाला स्नो लावून त्यावरून पावडरींतील फूल फिरवलें. कपाटांतून हीना सेंटची अनास्वादित बाटली काढली. त्यांतील थोडेसें सेंट तिनें स्वतःच्या हातरुमालावर व पातळाच्या पुढील पदराच्या भागावर शिंपडलें. नंतर तिनें विभाकराच्या हात-

रुमालावर व शर्टवर त्या सेंटचा थोडासा शिडकाव केला. आणि नंतर तीं बाहेर पडलीं.

तलम केशरी साडींतून दिसणाऱ्या तिच्या गौरवर्ण पुष्ट पोटऱ्या, त्यावरील थोडासा भाग–त्यावर अंडरवेअर–कोवळया केळीच्या खुंटासारखा तो तेवढा भाग दिसत होता. ती कृशकटी होती. कटीजवळ किंचित् बांक दिसत होता, त्यांयोगानें तिची पाठमोरी आकृति प्रत्यंचा ताणलेल्या धनुष्याकृतिसारखी दिसत होती. नितंबचुंबी केसांचा झुबका बुचड्याच्या स्वरूपांत मानेवर विलसला होता. त्यावर शेवंतीच्या फुलांची अर्धवर्तुळाकार वेणी होती. आधींच सुंदर असलेल्या चेहऱ्यावरील सौंदर्याची तकाकी स्नो-पावडरच्या सहाय्यानें द्विगुणीत झाली होती अन् त्यांमुळें ती जास्तच मोहक अन् विलोभनीय दिसत होती. सहजपणें फिरणारी ती चंचल नजर हृदयाचा भेद करण्याइतकी समर्थ होती. गाल अन् कान यांच्या सीमारेषेपर्यंत तिनें आपले केस फुगवून आणले होते अन् नंतर ते वळवून मागें नेले होते. जणुं, प्रियकरानें हर्षभरीत अंतः-करणानें प्रणयाच्या उन्मादावस्थेंत प्रेयसीचें चुंबन घ्यावें अन् त्यावेळीं अनुरक्त असलेल्याच, पण अवेळीं झालेल्या या प्रसंगांमुळें रुसलेल्या प्रियकरणीची समजूत घालण्यासाठीं कानांत कानगोष्ट सांगणाऱ्या प्रियकराप्रमाणें–तिचे ते केसाचे फुगे तिच्या कानाशीं कानगोष्ट करीत होते. प्रियकराच्या चुंबन प्रसंगानंतर प्रेयसीच्या गालांवर लाली चढते, पण तिच्या गालांवरील ती मूळची लालीच-काळया केसांच्या फुग्यांच्या सान्निध्यानें जास्त खुलून दिसत होती.

तीं दोघेंही हिरवळीवर बसलीं. जवळच बकुळीचें झाड होतें. त्यावर सुंदरसा हॅमॉक लोंबकळत होता.

तीं नुक्तेंच बोटिंग करून थकून त्या ठिकाणीं बसली होतीं. त्यावेळीं सात साडेसात वाजले होते. पौर्णिमेचं पांढरं धवल चांदणं चहूंकडे पसरलं होतं. पौर्णिमेच्या धवलिमेंत संध्येचा नीलिमा मिसळला. त्या पौर्णिमेच्या सुषमेंत तीं दोघेंही न्हाऊन निघालीं होतीं. पाय पसरून अन् दोन्हीं हात पाठीमागें नेऊन-टेकवून ती बसली होती. तिच्या उरोजावरील पदर किंचित् बाजूला झाला होता. तिच्या निळसर विरळ व्हेम्टमधून आंतील-पांढऱ्या कापडाआड दडलेलीं-टचटचीत अग्रें स्पष्ट दिसत होतीं. आधींच विलासाला सदा हापापलेल्या विभाकराची अतृप्तोत्कंठा जागृत झाली अन् त्यानें तिला आपल्या बाहुपाशांत आवेशानें आवळली.

रत्नाच्या आग्रहानेंच विभाकरानें बकुळीला बांधलेला हॅमॉक खालीं सोडला. त्यावर रत्ना बसली. हळूंहळूं ती हेलकावे घेऊं लागली. त्या हेलकाव्यानें बकुळीच्या फांदीला हबके बसूं लागले. अन् त्या हबक्यानें नुकत्याच उमलण्यास सुरवात झालेल्या कळया खालीं पडूं लागल्या. क्षणकालचा त्यांचा वर्षाव पावसाच्या सरीप्रमाणें झाला. बऱ्याचशा कळया विभाकराच्या अंगावर पडल्या. त्या कळयांच्या गार-गंध-सुगंधी-चुंबनांच्या बरसातीनें त्याचें सारें शरीर महिरून निघालें. हॅमॉकवरून झोके घेणाऱ्या रत्नाकडे तो अनिमिष उत्सुकतेनें पाहात होता. हॅमॉकमुळें उत्पन्न होणाऱ्या वाऱ्याच्या झोतानें तिचें पातळ फडफडूं लागलें. त्या फडफडणाऱ्या पातळांतून तिच्या पुष्ट पोटऱ्या रसभरीत पक्व कलमी आंब्यासारख्या

दिसल्या. विभाकराला राहवेना. त्यानें हॅमॉकचा वेग अडविला. आणि नंतर तो स्वतः तिच्या शेजारीं बसला व त्या झुलत्या हिंदोळ्यावरील आंतल्या साऱ्या वृत्तींना गुद्‌गुल्या करण्यास समर्थ असणाऱ्या अवर्णनीय सुखाचा आस्वाद घेतला.

वृत्तींना महिरून सोडणारा हा आल्हाददायक प्रसंग जसा तिला आतां आठवला तसेंच हृदयविच्छेद करणारे विभाकराचे ते शब्दही तिला आठवले.

तिला वाटलं, विभाकराचें आपल्यावर निःसीम प्रेम असेल. तो आपल्याशीं लग्न करील. आणि म्हणूनच तिनें त्यास आज लग्ना-बद्दल विचारलें होतें. पण त्यानें चक्क नकार दिला.

ती चिडली. तिचा संताप अनिवार झाला. सात्विक संतापानें लाल झालेल्या त्या तेजस्वितेकडे पाहाण्याचें धैर्य विभाकराला होईना. त्यानें तेथून काढता पाय घेतला. तिचा संताप विकोपास जाण्यास त्यानें तसेच कटू शब्द उच्चारले होते.

दुःखाचा पहिला भर ओसरल्यानंतर विभाकराच्या शब्दांतील सत्यतेचा छडा लावण्यासाठीं ती आपल्या आईकडे गेली. तिनें आईला निर्वाणीनें विचारलें. आईनें कांहींएक न बोलतां तिच्या हातांत एक पुडकें दिलें.

तें पुडकें—म्हणजे एक हस्तलिखित चोपडे होतें.

त्यांत काय लिहिलें आहे ?

त्यांत तिच्या—रत्नाच्या आइच्या—आयुष्याचा जमाखर्च लिहिला आहे.

* * * *

यौवनाची उन्मत्तता, अनुभवाचा अभाव आणि मोकाट व स्वैर वातावरण–विवेकाला वाव राहात नाहीं अशा वेळीं. तीच तऱ्हा रत्नाची झाली. विवेकाच्या अभावीं भलत्या थराला पोहोंचलेली रत्ना आज खोल–खोल–दुःखाच्या दरींत पडली होती.

स्वतःच्या हातानें पेटविलेला वणवा तो–त्यांतून तिला आतां मार्ग काढायचा होता.

रत्नाला कलेचा हव्यास होता. गायनाची गोडी–सर्व साधनांची अमूप अनुकूलता–तिनें गाणें शिकायची शिकस्त केली.

पण त्यांतही तिला विचित्र अनुभव आला.

तरी परंतु तिनें आपली गाणें शिकायची भूक अतृप्त ठेवायची नाहीं असेंच ठरविलें–नव्हे निश्चयच केला.

* * * *

रत्नाची गाण्याची–सुहासची आर्थिक संपादनाची–विभाकराची विलासाची–आणि वसंताची भूक— ?

वसंताला लागलेली भूक— ?

सडक्या समाजाची कीड काढण्याची भूक वसंताला लागली आहे.



## ५ प्रणयपूर

प्रिय निर्मला—

तुझें पत्र आलें, वाचलें. आणि अती खिन्नतेनें व नाइलाजास्तव निष्ठूरतेनें हें उत्तर लिहीत आहे.

आज तीन दिवस झाले मी हॉस्पिटलमध्यें पडून आहे. माझ्या डोक्याला जबर दुखापत झाली आहे. मात्र काळजी करीत बसण्याइतकी शोचनीय अवस्था नाहीं हें आधींच सांगितलेलें बरें.

तुझे वडील तुझ्या लग्नाच्या खटपटींत आहेत हें मला माहीत आहे. त्यांनीं मला स्वतःलाच प्रत्यक्ष याबाबत प्रश्न टाकला होता. परंतु मी त्यांना नकार दिला आहे. माझें हें कृत्य चुकीचें झालें असेल—नाहीं असें नाहीं. लग्न न करून घेण्याचें कारण तुला विस्तारानें

कळविलें आहे, तसें तुझ्या वडिलांना सांगतां येणें कठीण आहे. मी लग्नाला तयार नाहीं हें पाहून त्यांनीं तुझ्यासाठीं निराळ्या वराचें संशोधन करावें हें योग्यच आहे. माझें हें म्हणणें पाहून तूं मला निष्ठूर म्हणशील याची जाणीव आहे माझ्या मनाला. पण ही वस्तुस्थिती आहे. न बोलून दाखविल्यानें तिची प्रखरता थोडीच कमी होणार आहे ?

तुझ्या वडिलांनीं लग्नाचें निश्चित करण्याचें ठरविलें आहे, स्थळही कायम केलें आहे, तेव्हां प्रेम असल्यास ताबडतोब निघून यावें व लग्नास तयार व्हावें आणि प्रीतीच्या सुखांतील शाश्वततेचा उपभोग घेण्यास सज्ज व्हावें असें तूं पत्रांत लिहीतेस. पण एकदांच आणि शेवटचें सांगतों, कीं माझ्या प्रतिज्ञेच्या पूर्ततेसाठीं मला लग्न करतां येणें शक्य नाहीं. तुला माझ्यासारखेंच आपलेंही जीवन व्यतित करतां येणें शक्य असेल तर—लग्नाशिवाय तुझ्या प्रीतीचा आस्वाद घेण्यास मी तयार आहे. माझें हें वाक्य तुला भेदरवील. नीतीच्या विरुद्ध बडबड आहे असं तुला वाटेल. आणि खरोखरीच माझी ही बडबड प्रचलित नीति—तत्त्वाच्या विरुद्ध आहे हें मी कबूल करतों. प्रचलित नितिबंधनं इतकीं जाचक आहेत, कीं तीं मुकाट सहन करण्यापेक्षां तडातड तोडून टाकणेंच जास्त हितावह होईल. नीतीच्या-धर्माच्या—परंपरा या सापेक्ष आहेत. काल आणि परिस्थिति यांचा वाहता ओघ ओळखून त्यांच्यांत बदल केला पाहिजे. लग्न म्हणजे कांहीं सर्वस्व नाहीं. तेव्हां लग्नाशिवाय तूं आपल्या प्रीतीचा आस्वाद देण्यास तयार असशील तरच तुझ्या पत्राचा सहानुभूतिपूर्वक विचार करण्यांत येईल. नाहींपेक्षां तुझा मार्ग तुला मोकळा

आहे आणि माझा मार्ग मला मोकळा आहे. खुशाल लग्न करून एकाद्याच्या संसारांत रमून जा आणि सुखी हो. तूं सुखी झालेली पाहाण्यांतच मला समाधान वाटेल. पण लग्न करून घेण्याच्या तुझ्या अट्टाहासाला मात्र बळी पडणार नाहीं मी.

लग्नाशिवाय राहाणें म्हणजे स्वैराचारी होणें असा तूं निष्कर्ष यावरून काढशील, पण तसें नव्हे ! तर प्रीती ही इतकी अभेद्य, बळकट आणि शाश्वत स्वरूपाची असते, कीं प्रीतीनें जखडला गेलेला प्राणी कदापि स्वैराचारी बनणें शक्य नाहीं. 'नीति–नीति' म्हणून जिला आपण संबोधतों, त्या नीतीचा पदोपदीं खून पडत आहे, मग त्यापेक्षां एकदां उघड उघडच तिचा समूळ उच्छेदच केलेला बरें नव्हें कां ? म्हणजे, चोरट्या कृत्यांचा सुळसुळाट तरी नाहींसा होईल. आणि असं होईल तेव्हांच समाजांत स्थैर्य प्राप्त होईल. थोडक्यांत ही लग्नसंस्था नको. सारा समाज मुक्तप्रेमाचा उपासक बनला पाहिजे.

माझा हा आशय मी यापूर्वींच तुला सांगितला होता. आज पुन्हां सांगितला आहे. माझ्या पत्राचा नीट शांतपणें विचार कर अन् मग उत्तर दे.

तुझा ( ? )
**वसंत वेलीणे**

* * * *

वसंत हॉस्पिटलमध्यें आहे. खरी गोष्ट आहे ती ! त्याच्या डोक्याला मार लागला आहे हेंही खरें आहे.

वसंत ज्या गिरणींत उमेदवारी करतो आहे, त्या गिरणींतली हकीकत—

स्त्री–मजुरांचा अधिकारी फार रंगेल अन् उद्धट आहे.

स्त्री–मजुरांवर मुख्य म्हणून एक स्त्रीच असते. गिरणींतले लोक तिला 'नायकीण' या शब्दानें ओळखतात. तिच्यावर जो अधिकारी असतो तो मात्र मास्तर !

एकदां या मास्तराची पापी नजर स्त्री–कामगारांपैकीं एकीवर फिरली. त्यानें अनेक युक्त्या-प्रयुक्त्या करून पाहिल्या, पण त्याला यश येईना.

त्याचा हा कावा वसंत ओळखून होता. प्रत्येक वेळीं वसंत मोठ्या कौशल्यानें त्याला रोखी. त्यालाही वसंतच आपल्याला रोखतो हें कळून चुकलें होतें. पण तसें स्पष्ट बोलून दाखविण्यासारखें नव्हतें व म्हणूनच कृतीनेंही कांहीं करण्यासारखें नव्हतें.

वसंतानें आपलें वजन खर्च केलें व त्याला तेथून काढून दुसऱ्या खात्यांत नेमलें. स्त्री–कामगारांवरील त्याचा अधिकार कमी झाला. त्यानें तें मुकाट सहन केलें. पण आंतून तो फारच चिडला होता. केव्हां एकदां याचा कांटा काढीन असें त्याला झालें होतें.

त्याच्या आसुरी इच्छेची पूर्तता होईल अशी संधी आली. एकदां वसंत रात्रपाळीची पाहाणी करण्यासाठीं गिरणींत गेला. त्या मास्तराला आधींच तें कळलं होतं. तो पाळत ठेवूनच बसला होता. गिरणींतील पाहाणी झाल्यावर वसंत बाहेर पडला–कांहींसा चालून गेला असेल तोंच त्याच्या डोक्यांत मोठ्या लठ्ठशा काठीचा तडाखा बसला.

जवळपास कुठें व्हिक्टोरिआ दिसली नाहीं. साधारण मोठ्या रस्त्याला, किंवा ट्रामच्या रस्त्याला व्हिक्टोरिआ भेटेल, नंतर आपण

घरीं जाऊं असा विचार करून तो चालतच निघाला होता. पण दुर्दैव त्याच्या पाठीमागें होतंच.

वसंत झीट येऊन पडला. त्यानें आणखी दोन तडाखे मारले व धूम ठोकली.

वसंत बेशुद्ध होता. तो शुद्धीवर आला, तेव्हां त्याला कळलं, कीं आपण सध्यां हॉस्पिटलमध्यें आहोंत आणि रात्रीच्या शिपायानें ही व्यवस्था केली आहे.

शुद्धीवर आल्यावर वसंताला अनेक प्रश्न पोलिस-हेडकॉन्स्टेबलनें विचारले, पण त्यानें कांहींच माहीत नसल्याचें सांगितलें. मागून कोण आलं हें कळलंच नाहीं—असें त्यानें सांगून टाकलें. पण त्याला नक्की आपल्याला मास्तरनेंच मारलें असलें पाहिजे अशी खात्री होती.

इकडे, त्या मास्तरानें पुन्हां खटपट करून मोठ्या मिनतवारीनें ती पहिली जागा मिळवली. आणि पहिल्यानें त्यानें सूड म्हणून त्या—जिच्यावर त्याची पापी दृष्टी होती त्या—बाईला कामावरून काढून टाकलें.

ज्यानें आपल्याला हरघडीं मदत केली, तो दयाळू मनुष्य हॉस्पिटलमध्यें आहे असें कळल्यानें ती बाई हॉस्पिटलमध्यें त्याच्या समाचाराला जात असे. गिरणींतल्या बहुतेक सर्वांचा तो आवडता झाला होता. रोज त्याच्याकडे पुष्कळजणं येत. बायकाही येत असत.

एका बाईनें वसंताला सारें कांहीं सांगितलें. पुन्हां तो मास्तर तिथं आला हें ऐकून त्यास फार वाईट वाटलें. आणि विशेषतः त्या बाईला कामावरून दूर केल्याचें ऐकून तर फारच वाईट वाटलें. पण

त्याहीपेक्षां जास्त वाईट वाटलें असेल, तर तें—त्या बाईला कामावरून काढूनच तो थांबला नाहीं, तर तिचा नवराही त्याच गिरणींत त्रासन खात्यांत काम करीत होता—त्यालाही त्यानें हरप्रयत्नानें कामावरून दूर केलें होतें—हें ऐकून.

या मास्तराला गिरणींतून अजीबात कामावरून दूर कसें करावें याबद्दलचा विचार वसंत करूं लागला आणि अखेर विचारांची निश्चिति झाल्यावर त्यानें त्या आपल्या क्रांतिमय विचाराची वाच्यता केली.

प्रथम स्त्रियांपेकीं कोणीच तयार होईनात. पण त्यानें जेव्हां नीट सारं कांहीं समजावून सांगितलं तेव्हां त्या साऱ्या तयार झाल्या.

झालें ! स्त्री मजुरांनीं संप पुकारला. त्यांचा तो संप बैठा होता. कामावर हजर व्हायचें, पण काम करावयाचें नाहीं असं धोरण त्यांनीं ठरलें.

एक दिवस गेला. दुसऱ्या दिवशीं मॅनेजरनें कारण विचारलें. सगळ्यांनीं एकच उत्तर दिलें—' या मास्तरला गिरणींतून अजीबात हांकून लावा. पुन्हां त्याला इथं कामावर ठेवूं नका. '

त्यांच्या त्या जोरदार संघटनेपुढं मॅनेजरला हात टेकवावे लागले. त्यानें त्यांची तक्रार मान्य केली. महिन्याअखेर कामावरून काढून टाकतो असें अश्वासन दिलें. स्त्रीकामगारांनीं ही गोष्ट वसंताला कळविली. त्यानें पुन्हां निक्षून सांगितलें—'तो कामावरून दूर होईपर्यंत संप मोडूं नका. महिन्याअखेरची सबब ऐकूं नका '.

मॅनेजरनें पुन्हां 'संप कां संपवीत नाहीं?' म्हणून विचारलें. त्यांनीं सर्वांनीं तो कामावरून दूर होईल तेव्हांच आम्ही काम करूं असें एकमुखानें उत्तर दिलें.

त्यांचा संप यशस्वी झाला.

तो कामावरून तत्काळ दूर झाला.

पण हा संप घडवून आणला कोणी हें मात्र कोणालाच कळलें नाहीं.

* * * *

वसंताचें तें निर्वाणीचें पत्र पाहून निर्मलेनें स्वतःच त्याला भेटायला जायचें ठरविलें, आणि ठरविल्याप्रमाणें ती निघालीही.

निर्मला, वसंत ज्या हॉस्पिटलमध्यें आहे असं तिला कळलं होतं त्या हॉस्पिटलमध्यें आली. पण त्याच्या आदल्याच दिवशीं वसंत तेथून परत गेला होता. निराश होत्साती निर्मला तेथून वसंताच्या खोलीवर आली. पण तिथंही वसंत नव्हता!

नंतर तिनें एका बड्या हॉटेलांत सामान ठेवलें व गिरणींत चौकशीसाठीं ती आली. पण तिथंही वसंताचा पत्ता तिला लागला नाहीं.

वसंताची रजा अद्याप आठ दिवसपर्यंत होती. तेव्हां इतक्यांत तो परत येणं शक्य दिसत नाहीं असं वाटल्यानें ती रडकुंडीला आली. काय करावं हेंच तिला सुचेना! ती अगदीं दिङ्मूढ होऊन गेली.

* * * *

प्रिय मित्र वसंत यांस सप्रेम नमस्कारः—

**“ ये बाहेरीं अंडें फोडुनी**
**शुद्ध मोकळया वातावरणीं**
**कां गुदमरसी आंतच कुढुनी ?**
**कां बागुल रचितोसि उरीं ?**
**घनतमीं शुक्र बघ राज्य करी ”**

आधुनिक भौतिक शास्त्रांवर उभारलेल्या पाश्चात्य संस्कृतीचा आणि मार्क्सप्रणीत साम्यवादाचा मी एकनिष्ठ चहाता आहे हें तुला माहीत आहेच. अन्याय, अत्याचार, जुलूम जबरदस्ती व दारिद्र्य यांचा नाश करण्यासाठींच या साम्यवादी तत्त्वज्ञानाचा जन्म झाला असावा—आहे.

व्यक्तित्व म्हणून ज्याला म्हणतात तें ‘व्यक्तित्व’ प्रत्येकाला आहे. जग हें केवळ ‘माझ्या’च एकट्यानें भरलेलें नाहीं. माझ्या-प्रमाणेंच जगांत अनेक मानव आहेत. त्या प्रत्येकांना व्यक्तित्व आहे. माझ्या एकट्याच्याच फक्त व्यक्तित्वाचा विकास व्हावा ही आजपर्यंतची आपमतलबी भावना उच्छेदिली पाहिजे. माझ्या व्यक्तित्वाचा विकास व्हावा असं ज्याप्रमाणें मला वाटतं—त्याप्रमाणेंच प्रत्येकासही वाटत असतं. पण सर्वांच्या व्यक्तित्वाचा विकास होण्यास आजच्या या समाजांत सारखी संधी नाहीं. ती उत्पन्न व्हावी एवढ्यासाठीं झटलं पाहिजे—प्रसंगीं प्राणही खर्ची घातले पाहिजेत.

श्रीमंत वर्ग म्हणजे साऱ्या सृष्टींतील एक अत्यल्प भाग. या मूठभर श्रीमंतांच्या व्यक्तित्वविकासासाठीं-छे, नव्हे—सुखासाठीं

—आज कितीतरी मानवांना रक्त आटवावें लागतें आहे. सर्व मानवांच्या विकासासाठीं सारखीच संधी कां बरं असूं नये ? या मूठभर श्रीमंतांच्या सुखासाठीं इतरांचें रक्तशोषण कां बरं होत रहावें ?

याचें कारण फारसें अवघड नाहीं. आज सारी श्रमशक्ती वायां जात आहे. मूठभर श्रीमंतांच्या सुखासाठीं—वैभवासाठीं खर्चिली जात आहे.

सामुदायिक शासनप्रणाली समाजांत अवतीर्ण झाली पाहिजे. आज वायफाट खर्चिली जाणारी श्रमशक्ती सामुदायिक सुखासाठीं—सामुदायिक वैभवासाठीं—खर्चिली गेल्यास समाज सुखी अन् उन्नत होईल असा माझा अंदाज आहे. पण एवढ्यासाठीं—हा बदल घडवून आणण्यासाठीं—ज्या संघटनेची आवश्यकता आहे—ती संघटना आमच्या समाजांत नाहीं.

राजसत्ताक राज्य, भांडवलशाही अस्तित्वांत आहे तोंपर्यंतच टिकून राहील. भांडवलशाहीच्या पायावरच राजसत्ताक राज्याची उभारणी आहे हें कोणाही विचारवंताला पटेल. या राजसत्ताक राज्याची उलथापालथ करायची—तिच्या जागीं सामुदायिक शासन-प्रणाली व सामुदायिक सत्ता—पद्धति अमलांत आणावयाची म्हणजे तेवढ्यासाठीं जोरदार संघटना झाली पाहिजे. एकट्या—दुकट्याच्या हांतून हें कार्य होणें दुरापास्त आहे.

सामुदायिक तत्त्वप्रणालीची हाव ज्याला लागली आहे, आणि एकट्या—दुकट्याच्या हांतून तर होत नाहीं असं जेव्हां कळतं, तेव्हांच तो दहशतवादाकडे झुकतो. मला वाटतं दहशतवादाचा जन्मच संघटनेच्या अभावीं होणाऱ्या चळवळींत झाला असावा. देशांतील प्रत्येक मानव सूज्ञ अन् प्रतिकारक्षम होईल तेव्हांच दहशतवादाचा नाश होईल.

ही स्थिती आज आपल्या समाजांत नाहीं म्हणून मलाही दहशतवाद्याची भूमिका स्वीकारावी लागत आहे.

कलेक्टर जॅक्सनचा खून करणारे कान्हेरे, कर्वे प्रभृति, कर्झन वायलीचा खून करणारे मदनलाल धिंगारा, बंगालचा तरूण नानी गोपाळ आणि महाराष्ट्रांतला वासुदेव गोगटे या साऱ्यांचीं कृत्यें आज माझ्यासमोर—माझ्या मनश्चक्षूंसमोर—नाचूं लागलीं आहेत.

या साऱ्या दहशतवाद्यांचीं तीं भयंकर कृत्यें आज माझ्या-समोर नाचावींत असेंच कारण आज घडून आलें आहे. पण त्याची पत्रांत वाच्यता करणें अशक्य आहे. या पत्रानें तुला एवढंच कळ-वायचं आहे, कीं तूं असशील तसा निघून ये. सध्यां तुझी फार जरूरी आहे.

तूं कॉंग्रेसचा सभासद नाहींस, मीही नाहीं. मी कॉंग्रेसचा सभासद नसलों तरी मला कॉंग्रेसचीं अहिंसेचीं तत्त्वें विशिष्टमर्यादे-पर्यंतच पटतात. राजकीय क्षेत्रांत भावनाप्रधानतेनें पाऊल टाक-णारास अहिंसेचें तत्त्व सदा सर्वकाळ स्वीकारतां येणें शक्य नाहीं.

आज मी एका मोठ्या कार्यांत गुंतलों आहे. मला हें कार्य शक्य तितक्या लौकर उरकावयाचें आहे. तेव्हां विलंब न लावतां ये. पर्वतीच्या पायरीवर घेतलेल्या शपथेची स्मृती ठेवून ये—धांवत ये.

तुझाच

**हिमांशु.**

* * *

गाडी प्रणयपूर स्टेशनच्या आवारांत शिरत होती. एका रुळाव-रून दुसऱ्या रुळावर जाणाऱ्या गाडीचा आवाज कर्णरंध्रांत घुमत होता. गाडीच्या खडखडाटाइतकाच वसंताच्या हृदयाचा धडधडाट चालूं होता. वसंतानें आपल्याबरोबर सामान कांहींच आणले नव्हतें. तो भयचकित उत्सुकतेनें प्रणयपूर नगराकडे पाहात होता. प्रणय-पूरचा तो भव्य तलाव त्याला दिसला. पलीकडील क्रीडांगण, त्या-पलीकडील सार्वजनिक बाग सारें त्याच्या दृष्टीपुढून गेलें. गाडी त्या भव्य स्टेशनांत शिरली–आणि वसंत धीम्या पावलानें अन् गंभीर अविर्भावानें खालीं उतरला. तिकीट देऊन तो स्टेशनबाहेर आला. दोन घोड्यांच्या गाडीचें त्या गांवीं वैशिष्ट्य होतें. त्यानें कशाकडेच लक्ष दिलें नाहीं.

कालच सकाळीं तो हॉस्पिटलमधून खोलीवर आला होता. त्याच्या डोक्याची जखम पूर्ण बरी झाली नव्हती, पण आतां पट्टया बांधण्याइतपत उग्र स्वरूपाचीही नव्हती. खांद्याची बाजू बरीच सुजली होती. पण आतां ती सूज कमी झाली होती. चालतांना त्याच्या खांद्याला कळा येत, पण तो सहन करी.

" कुठं जायचं शेटसाब ? " गाडीवाल्यानें हटकलें.

वसंतानें त्याच्याकडे लक्ष दिलें नाहीं.

तलावाच्या कठड्यावर शाळेंतलीं मुलें जमावाजमावानें बसलीं होतीं मुलीही हंसत खिदळत फिरत होत्या. चित्रविचित्र रंगांच्या साड्या पेहेरलेल्या मुलींचा घोळका नभःप्रांगणांतील इंद्रधनुष्याच्या रंगाप्रमाणें दिसत होता. त्यांच्या हास्याचे गोड चीत्कार वसंतऋतूंतल्या

कोकिलांच्या कूजनासारखें वाटत. सायंकाळची वेळ असल्यानें संध्यारंगाची खैरात क्षितिजावर झालेली दिसत होती. तलावांतील पाणी चकाकत होतं. दूर लांबवर—बाजूस मासे धरण्यासाठीं गळ टाकून बसलेले कांहीं लोक त्याला दिसले अन् तें पाहून त्याला हिमांशुच्या पत्रांतील मजकूर आठवला. तो विचार करूं लागला—कुठल्या माशाला मारण्यासाठीं हिमांशु गळ टाकून बसला आहे? आपल्याला कशासाठीं बोलावलं असेल त्यानें? आणि आपणही कसे ताबडतोब त्याचं पत्र पाहातांच निघालों! हेंच त्याचं पत्र आधीं एकदोन दिवस आलं असतं तर-किंवा पुढें आणखी आठ दिवसांनीं आलं असतं तर—आपल्याला असं निघतां आलं असतं कां?

स्टेशनची हद्द ओलांडून तो आतां शहराच्या वस्तीनजीक येऊन ठेपला होता. तलावाची नयनरम्य जागा मागें गेली होती. तो सार्वजनिक बागेच्याही पलीकडे आला होता. बागेपलीकडील चौकांत एक मारुतीचें अगदीं लहानसें पण नवीनच बांधलेलें देऊळ होतें. चौकांतल्या डाव्या बाजूला मशीद होती. मशीद फार मोठी नव्हती पण व्यवस्थित बांधलेली होती. सब्जाच्या रोपट्यांच्या कुंड्या दिसत होत्या. त्यांचा उग्र गंध-सुगंध दरवळत होता. वाऱ्याच्या झोतानें तो जास्तच जाणवला. शहरांतील रस्त्यावरील दिवे लागले होते. ते दूरवर दिसणारे दिवे-दुरून पहांटे पाहिलेल्या शुक्राच्या-तर अपरात्रीं डोळे चोळीत पाहिलेल्या मंगळाच्या ताऱ्यासारखे त्यावेळच्या संधिप्रकाशांत चकाकत असल्यासारखे वाटे.

तो वेशींतून—त्या भव्य वेशींतून— आंत गेला.

प्रणयपुरांत त्यानें पाऊल ठेवलें.



# ६ दोन खून

अद्यावत् पद्धतीनें सजविलेल्या रम्य दिवाणखान्यांत सुहास एका गादीवजा खुर्चीवर बसली होती. भिंतीवर निरनिराळ्या प्रकारचीं राजा रविवर्म्याचीं सुंदर चित्रें लटकाविलीं होतीं. कांहीं निसर्गशोभेचीं प्रेक्षणीय अशींही सुंदर सुंदर चित्रें होतीं. फर्निचर भरपूर, अद्यावत् पद्धतीचं अन् व्यवस्थित् रीतीनें मांडून ठेविलेलं होतं.

ती रत्नाच्या घरीं आली होती.

सुहासनें रत्नाला विमा कंपनीची पॉलिसी घेण्याबद्दल गळ घातली. रत्ना त्या गोष्टीला खूष होती, पण आईची सम्मति घेतल्याशिवाय ती तयार होईना. रत्नानें स्वतः तर पॉलिसी घेऊंच पण आणखीही एका इसमाला—स्वतःच्या वडिलांनाहीं—पॉलिसी घ्यायला लावूं असें

आश्वासन सुहासला दिलें होतें. रत्ना आज आपल्या वडिलांची अन् सुहासची भेट करवून देणार होती.

सुहासला बाहेर बसवून रत्ना आंत चहा करायला सांगणयसाठीं गेली. थोड्या वेळानें ती बाहेर आली.

"सुहास तुझी आज निराशा होणारसं दिसतं आहे बाई! आईही घरांत नाहीं अन् मोहनकाकाही घरांत नाहींत." रत्ना म्हणाली. रत्ना आपल्या वडिलांना मोहनकाका म्हणत असे.

रत्नाचे वडील—मोहन—हे मुंबईच्या एका गिरणीमालकाचे जांवई आहेत. वसंत ज्या गिरणींत काम करतो आहे त्याच गिरणीमालकाची मुलगी मोहनशेटची पत्नी. लग्न होण्यापूर्वी त्यांच्या सासऱ्यांत व त्यांच्यांत कांहीं तोंडी करार झाले होते. लग्नानंतर साधारण सहा महिनेपर्यंत मोहनशेटनीं आपल्या पत्नीला नीट वागवलं. आणि नंतर गिरणी आपल्या नांवे करून देत असल्यास तूं माझ्याजवळ राहा, नाहींपेक्षां आपल्या बापाकडेच राहा असें त्यांनीं आपल्या बायकोस स्वच्छ सांगितलें. मोहनजीच्या सासऱ्यास—सुंदरजींना—मुलगा नव्हताच. एकुलती एक मुलगी—तिच्याच नांवे गिरणी करून द्यायची असा त्यांचा बेत होता. आणि बाकीची मालमत्ता दानधर्मास खर्चा-यची असें त्यांनीं ठरविलें होतें. परंतु मोहनशेटजीस हें सारें ताबड-तोब व्हावें असें वाटत होतें. आणि सुंदरजी त्या गोष्टीला नापसंत होते. सुंदरजी जी अळंटळं करीत होते त्याला कारणही तसंच होतं. त्यांना आपल्या जावयाची वागणूक पसंत नव्हती. लग्नापूर्वीं त्यांना मोहनजीबद्दल फार आदर होता. मोहनजींच्या वर्तणुकींतील कुटील-

पणा त्यांच्या नजरेला आला नव्हता. लग्नानंतर तें सारं त्यांना कळून आलं म्हणून त्यांनीं त्या गोष्टीला हरकत घेतली.

मोहनजींचें वय कांहीं फारसे नव्हतें. त्यांचें वय फारतर पंचवीस सव्वीस होतें. पण तेवढ्यांत त्यांना दारू—बाहेरख्याली—सट्टा—रेस सर्व प्रकारचीं व्यसनें लागलीं होतीं. बायकोला माहेरीं टाकल्यानंतर तर त्यांच्या बाहेरख्यालीपणाला ऊत आला. आणि अखेरीस त्यांनीं अगदीं राजरोसपणें एका बाईस घरीं आणून ठेविलें. तीच रत्नाची आई-मात्र ती अद्यापपावेतों त्यांच्याजवळ आहे. अगदीं एकनिष्ठपणें राहिली आहे.

कमलाबेन—रत्नाची आई—यांचीं अन् मोहनशेटची प्रथम भेट अशीच चमत्कारिकपणें झाली.

मोहनशेटचे स्नेही मोहनशेटच्या साऱ्या लोभपूर्तीसाठीं खटपट करीत व अशा रीतीनें ते स्वतःचाही षोक पुरा करून घेत.

मोहनशेटचा—राजाराम—नांवाचा एक स्नेही होता. या राजारामास एकदां एक चमत्कारिक बातमी लागली.

वसंतभुवन नांवाच्या एका बड्या हॉटेलांत प्रणयपूरचे रावबहादूर एका तरुण सुंदर विधवेसह उतरले होते. ती विधवा स्त्री ऐन तारुण्याच्या उमेदींतली होती. रूपानें उत्तम होती. प्रणयपूरच्या शाळेंत ती शिक्षकीण होती. रावबहादुरांच्याच वशिल्यानें ती लागली होती. रावबहादुरांनी तिला आतां जें इथं आणलं तें ती गरोदर होती म्हणून ! रावबहादुरांनीं तिची सोय एका आश्रमांत गुपचूपपणें केली व ते निघून गेले. त्या आश्रमांत तिचे सुरवातीचे दिवस बरे गेले.

तिला मुलगा झाला. त्यानंतर परत जाण्याची गोष्ट तिनें तेथल्या चालकांजवळ काढली. पण चालकांनीं तें मनावर घेतलं नाहीं. चालकांची तिच्यावर बहाल मर्जी होती. ते तिला सोडीनात. पुढें कांहीं दिवसांनीं चालकांची आपल्यावर बहाल मर्जी कां आहे हें तिला कळून चुकलें. पण त्यावेळीं ती जळयांत फसलेली एक असहाय्य अबला होती. आर्थिक—स्वातंत्र्यांत आलेल्या रावबहादुरांसमवेतच्या कटू अनुभवाचा घोट जिभेवर जातों न जातो तोंच पुन्हां आश्रमांत चालकांसमवेत विषाचा घोट पिण्यास तिला तयार व्हावें लागलें.

अशा स्थितींत कांहीं दिवस गेल्यानंतर तिला तेथल्या राहाणीचा कंटाळा आला. एकदां इथून निसटायचंच असा निश्चय करून संधी साधून ती तेथून पळाली. बाहेरच्या जगांत कोरड्या सहानुभूतीनेंही कोणी ढुंकून पाहाणार नाहीं, तिथें तिला तरी स्वार्थानपेक्ष हेतुशून्य दयेचा शब्द कसा ऐकण्यास मिळणार ?

एका म्हाताऱ्या लठ्ठशा स्त्रीस तिची दया आली व तिनें तिला आश्रय दिला. पण तिच्या घरची राहाणीं म्हणजे आगींतून सुटून फुफाट्यांत आल्याप्रमाणें झालं तिला. रोज नवा चेहरा अन् जुना कार्यक्रम ! बिचारी त्रासून गेली. आतां आपण माणसांतून पूर्ण उठलों याबद्दल तिची खात्री झाली. पण यांतही कुठेंतरी एकाच ठिकाणीं राहातां येईल कां याकडे ती आशा लावून बसली होती.

तिच्या सुदैवानें म्हणा, कीं आणखी कांहीं म्हणा—राजारामाची तिची भेट झाली. राजारामास चार थापा मारून खूष करून वर चार पैसे देऊन तिनें वश करून घेतलं व हलकेंच त्या म्हातारीच्या

धरून पळ काढला आणि मोहनशेटच्या घरीं आली. ती आली ती अद्याप त्यांच्याचजवळ आहे. आज तिला मोहनशेटजवळ येऊन चोवीस तरी वर्षे झालीं असतील. हा वेळपावेतों ती अगदीं महाश्वेतेप्रमाणें राहिली आहे. शेटजींचेंही तिच्यावर प्रेम बसलें आहे. तेही तिला कधीं दुखवीत नाहींत. इथं आल्यानंतर तिला एक मुलगी झाली. तीच रत्ना होय. ! मुलगा मात्र हल्लीं कुठें आहे कोण जाणें ? अशी ही रत्नाची हकीकत आहे.

सुहास बराच वेळ बसली होती. अखेरीस ती कंटाळली अन् जाण्यासाठीं उठली.

रत्नाची आई बाहेर गेली होती–ती परत आली.

रत्नाची आई दारांतून आंत यायला अन् सुहास दारांतून बाहेर जायला एकच गांठ पडली.

सुहासनें रत्नाच्या आईला पाहिलं मात्र–तोंच तिनें आश्चर्यानें "कोण ? शकुंतलाबाई ! आणि तुम्ही— " असें कांहींसें संदिग्धपणें उद्गार काढले. अन्–अन्–तिच्या मनावरचा ताबा सुटला–ती त्याच ठिकाणीं बेशुद्ध पडली.

* * * *

सायंकाळच्या वेळीं प्रणयपुरांत उतरलेला वसंत पहांटेच्या गाडीनें परत निघालाही. मात्र येतांना तो मुंबईहून आला होता, तर आतां तो पुण्याला निघाला होता. त्याचा चेहरा विचारमग्न होता. गाडी वेगानें धांवत होती, त्याचे विचार त्याहीपेक्षां वेगानें धांवत होते.

तो सारखा आपल्या उजव्या बगडीजवळ हात न्यायचा, कांहीं-वेळ त्याठिकाणीं चाचपायचा अन् पुन्हां स्वस्थ राहायचा !

त्यारात्रीं तो हिमांशुच्या खोलीवर आठ वाजतां गेला. तोपर्यंत त्यानें बाहेरच जेवण वगैरे उरकून घेतलं होतं. हिमांशु खोलींतच होता. तो उद्योगांत मग्न झाला होता. त्याचा त्यावेळीं चाललेला उद्योग पाहून वसंत पहिल्याक्षणीं भेदरलाच.

हिमांशूनें त्याचें गोड शब्दांत व गोड हास्यानें स्वागत केलें. थोडावेळ गेल्यानंतर त्यानें आपली ट्रंक उघडली व त्यांतून दोन छायाचित्रें काढलीं. पैकीं एक त्यानें वसंताच्या हातांत दिलें व सांगितलें—"ही माझी आई."

वसंतानें तिच्याकडे निरखून पाहिलें. त्याच्या चेहऱ्यावर कांहीं-तरी निराळाच भाव उमटला. तिचा चेहरा त्याला परिचित वाटला असावा.

नंतर त्यानें दुसरें छायाचित्र त्याच्या हातांत दिलें. त्यांतली व्यक्ति तर त्याच्या पूर्ण परिचयाची होती.

सबंध रात्रभर ते दोघेही सारखे बोलत होते. गाडीची वेळ झाल्यानंतर हिमांशु स्वतः वसंताबरोबर स्टेशनवर गेला आणि गाडी सुटल्यानंतरच तो परत आला.

* * * *

दुसऱ्या दिवशीं भडक मथळ्यांत वृत्तपत्रांत खालील दोन बातम्या प्रसिद्ध झाल्या—

**एकाच्च दिवशीं दोन खून ! खुनी इसम बेपत्ता.**

प्रणयपूर, ता.—येथील माजी असिस्टंट कलेक्टर श्री. कोळेगांव कर यांचा काल रात्रौ अमानुषपणें खून करण्यांत आला.

रात्रौ अकरा वाजतां कोळेगांवकर आपल्या मोटारींतून चालले होते. महाराजा चौकापलीकडील वळणावर चिंचेचें मोठें झाड आहे, त्याखालीं साहेबांची मोटार गेली असावी, तोंच त्यांच्यावर पिस्तुलाचा हल्ला झाला. एका पाठोपाठ एक अशा दोन गोळ्या त्यांना लागल्या.

पिस्तुलाचा आवाज ऐकून माणसें जमा झालीं, पण त्यांना फार उशीर झाला. ड्रायव्हरास एक गोळी चाटून गेली होती. तो बसल्या जागींच बेशुद्ध पडला होता आणि साहेबांचें प्राणोत्क्रमण झालें होतें.

खुनी इसम फरारी आहे. पोलिस तपास चालूं आहे.

* * * *

प्रणयपूर, तारीख.—प्रणयपूरचे माजी म्यु० प्रेसिडेंट रावबहादूर प्रणयपूरकर हे रात्रौच्या गाडीनें पुण्यास निघाले होते. त्यांची प्रकृति पूर्ण बरी होती. त्यांनीं सेकंड क्लासचें तिकिट काढलें होतें. पहांटे गाडी दौंडला थांबली. त्यावेळीं तेथील स्टेशनमास्तरांना त्याचें प्रेत डब्याच्या दाराजवळच पडलेलें दिसलें. त्यांच्या उजव्या बरगड्यांमधून बरेंचसें रक्त वाहिलेलें होतें. त्यांच्या बरगडींत सुरा मारलेला होता. तो रक्तानें माखलेला सुरा तेथेंच पडलेला होता. ताबडतोब रेल्वे पोलिसांनीं गाडीची झडती घेतली—पोलिस तपास चालूं आहे. रावबहादुरांना त्या आधीं पाऊण तास तरी मारलें असावें असा अंदाज आहे.

* * * *

ज्या दिवशी वसंत आपल्या कामावर हजर झाला, त्या दिवशीं गिरणींतील कामगार बरेच असंतुष्ट असल्याचें त्याला कळून आलें.

# ८ स्वप्नांत

प्रणयपुराहून वसंत आला. अद्यापि कामावर जायला त्याला चार दिवसांचा अवधी होता. वसंत सायंकाळीं फिरून आपल्या खोलीवर परत आला, तों निर्मला दाराशीं तिष्ठत उभी असल्याचें त्याला दिसलें.

निर्मलेला मुंबईत येऊन दोन दिवस झाले होते. वसंताचा शोध लागत नाहीं असं पाहून ती अगदीं रडकुंडीला आली होती. आज जर वसंत भेटला नसता तर अगदीं निराश होऊन ती रात्रीं परतही गेली असती कदाचित् !

वसंत सकाळीं परत आला आहे हें तिला शेजाऱ्याकडून कळलं, तेव्हां तिनें चार हेलपाटे घातले, पण वसंत सबंध दिवसांत भेटलाच

नाहीं. पुन्हां दुसऱ्या दिवशीं सकाळीं ती खोलीवर आली, तरीसुद्धां तो भेटला नाहीं, तेव्हां तर तिचा धीर पार नाहींसा झाला. तिची खिन्नता लोपली आणि आज तर ती अगदींच रडकुंडीला आली होती. पण तिनें आपली चिकाटी सोडली नाहीं. आज त्याच्या खोलीच्या दरवाजांत सारखं बसून राहायचं असंच तिनें ठरविलं आणि तिच्या सुदैवानें सायंकाळीं वसंताची व तिची भेट झाली.

निर्मलेनें आपण कां येणें केलें हें त्याला थोडक्यांत सांगितलें. नंतर कांहीं औपचारिक गोष्टींचें बोलणें झाल्यावर तिनें आपलें सामान खोलींत आणलें. खोलींत वसंतानें भांडींकुंडीं वगैरे कांहीं जमविलीं नव्हतींच, तेव्हां स्वयंपाकाचा प्रश्न उपस्थित झाला नाहींच. तीं दोघेंही नंतर कांहीं वेळानें खानावळींत गेलीं व जेवून परत आलीं.

एकदम आपल्या खऱ्या प्रश्नाला सुरवात करून त्याच्या काळ-जाला हात घालावयाचा नाहीं असेंच निर्मलेनें धोरण ठेवलें व जेवून परत आल्यावर तिनें बोलणें सुरू केलें तें चालू स्थितीवर !

"गोखल्यांचें सनदशीर राजकारण नामशेष झालें असें म्हण-ण्यास आजतरी प्रत्यवाय नाहीं. कित्येक तरुणांना गोखल्यांचें म्हणून कांहीं निराळें राजकारण होतें हें आज माहीतही नाहीं. तसेंच लोकमान्य टिळकांचें स्वावलंबी राजकारण; पण तेंही लोकमान्यांच्या बरोबरच विलयाला गेलें. आणि आजचें महात्माजींचें सत्याग्रही अहिंसात्मक राजकारण तर पदोपदीं अयशस्वीच होत आहे हें आपण पाहातच आहोंत. मग अशा वेळीं कुठल्या विचारप्रणालीचें प्रस्थापन होईल, कुठलें राजकारण यशस्वी होईल हें निश्चितपणें कळणें कठीणच नाहीं कां ?" निर्मलेनें प्रश्न विचारला.

"क्रांतिकारक राजकारण यशस्वी होईल असें मला वाटतें. क्रांति घडवून आणण्यासाठीं हिंसा झालीच पाहिजे असें कांहीं नव्हें, पण प्रसंगीं अहिंसेलाही तत्पर झालें पाहिजे. विशेषतः हिंसा न करतां केवळ संघटनेच्या जोरावरही कांहीं कार्य यशस्वी करून दाखवितां येईल. पण पाया भक्कम असला पाहिजे. व आजचा अंधश्रद्धेवरील विश्वास उडाला पाहिजे. आर्थिक सत्तेमुळें जो संघ मग्रूर अन् प्रभावी झाला आहे त्याचा समूळ उच्छेद केला पाहिजे. मात्र असं करतांना ज्या आर्थिक इमारतीवर आजचें सरकारी धोरण आरूढ झालेलें आहे तें पदोपदीं जाचकच होणार. पण त्याला जुमानतां कामा नये. उत्पादक वर्ग हाच खरा मालक समजून त्या वर्गाला जाचणारी हल्लींची सर्व प्रचलित शासनसंस्था नष्ट करणें व त्याजागीं नवी साम्यस्वरूपी शासनसंस्था निर्माण करणें हेंच खरें क्रांतीचें कार्य व हें यशस्वी करायचें असेल तर खालच्या वर्गांत प्रथम जागृति उत्पन्न होईल अशी खटपट करावयास हवी व संघटनेचें बल वाढविलें पाहिजे." वसंत बोलत होता.

"समाजाच्या सिंहासनावर सामुदायिक तत्त्वें अधिष्ठित झालीं पाहिजेत असें तुम्हां क्रांतिवाद्यांचें म्हणणें. पण ज्या सामुदायिक तत्त्वांचा परकीय राष्ट्रांनीं थोडाबहुत पुरस्कार केला त्याच राष्ट्रांनीं या सामुदायिक सुरक्षिततेच्या तत्त्वांना सुरुंग लावला आहे हें आजचा इतिहासच सांगतो आहे. मग असं असतांना पुन्हां त्याच अपेशी तत्त्वांची घोषणा करण्याचें कारण ?" निर्मलेनें विचारलें.

"याचं कारण अगदीं उघड आहे. ज्या ज्या राष्ट्रांनीं या तत्त्वांचा पुरस्कार केला तीं तीं राष्ट्रें स्वतः भांडवलशाहीचे उत्पादक व पुरस्कारक

आहेत. आणि भांडवलशाहीच्या पुष्टीसाठीं आवश्यक असणारी नफेबाजीची चटकही त्यांची तीव्रतर आहे. हेंच त्यांच्या सामुदायिक तत्त्वांच्या गळचेपी कृत्यांचें कारण होय. आज तरी जीं राष्ट्रें वरून अगदीं शांत दिसत आहेत, तीं शांतच आहेत असें अनुमान करणें चुकीचें आहे. प्रत्येकाच्या अंतर्यामांत परस्परांविषयींच्या द्वेषाचा वडवानळ पेटलेला आहे. फक्त स्फोटच व्हायचें बाकी उरलें आहे. भर्तृहरीच्या शब्दांत आजच्या राष्ट्रांच्या वर्तणुकीचें वर्णन करावयाचें झाल्यास असें करतां येईल—

**" लुब्धमर्थेन गृह्णीयात्**
**क्रुद्धमंजलिकर्मणा**
**मूर्खश्छंदोनुवृत्तेन**
**याथातथ्येन पंडितम् ॥ "**

" पण मग ही अघोरी स्थिति नष्ट कशानें होणार ? "

" साम्य-तत्त्वांच्या अम्मलबजावणीनें. परस्परांतला द्वेषभाव नाहींसा झाला पाहिजे-केला पाहिजे. दुसऱ्यावरील असलेलें आपलें प्रभुत्व आपण प्रथम सोडलें पाहिजे. दुसऱ्यावर असलेल्या प्रभुत्वामुळें एकजण दुसऱ्याची असह्य पिळणूक करीत असतो, ती बंद करतां आली पाहिजे. जागतिक कल्याणासाठीं परस्परांचें आर्थिक धोरण व तत्संबंधींचा व्यवहार निर्भेळ न्याय्य भूमिकेवर व न्याय्य तत्त्वावर आधारला गेला पाहिजे. एवढ्यासाठीं आधीं द्वेषभावांचें उच्छेदन—वर्गकलहाचें शिरकाण आणि विश्वबंधुत्वाचें प्रस्थापन केलें पाहिजे ! आज जर्मन यहुद्यांचा द्वेष करीत आहेत. आपल्या हिंदुस्थानांतही हिंदू-मुसलमानांचा परस्परांतला द्वेष प्रत्यहीं वाढत आहे. आजच

चार लाख खाकसार हिंदूंच्या नामशेषाबद्दल खटपट करीत आहेत. तर नुक्तेंच रत्नागिरीहून सुटलेले वीर सावरकर मुसलमानांचें कट्टे द्वेष्टे बनले आहेत. 'हिंदुस्थान हिंदूका-नहीं किसीके बाप का' अशा आरोळ्यांनीं त्यांनीं दशदिशा दुमदुमवून सोडल्या असल्या तरी अंतर्यामांतील मुस्लीमांविषयींचा द्वेष झांकून राहिलेला नाहीं. आज जर्मनांच्या हातीं सत्ता असल्यामुळें ते यहूद्यांचा छळ करीत आहेत, तेव्हां उद्यां जर हिंदुस्थान स्वतंत्र झाला तर—आणि स्वतंत्र हिंदुस्थानची सत्ता खाकसारांच्या—अल्लामा मश्रिकी—हातीं गेलीं तर तेही हिंदूंचा असाच छळ करतील कां ? किंवा हिंदुसभेच्या हातीं गेली तर ते तरी मुस्लिमांचा छळ करतील काय—असा प्रश्न उद्भवतोच. तेव्हां प्रथमतः हा धर्मद्वेष्टेपणा नाहींसा झाला पाहिजे. राष्ट्रासाठीं एक झालें पाहिजे. हातांत हात घालून बंधुत्वाच्या नात्यानें स्वातंत्र्यप्राप्तीच्या आखाड्यांत उतरलें पाहिजे. आज गांधींचा गट निराळा, रॉयचा गट निराळा, बोसबाबूंचा गट निराळा असे कितीतरी हिंदुस्थानच्या राजकारणांत गट आहेत. त्यांतच पुन्हां हिंदुसभा, हिंदु युवक संघ-मुस्लीम लीग-लोकशाही पक्ष-यांची भर पडलेली. एकाचा पायपोस एकाच्या पायांत नाहीं. हा बोलतो तें त्याला पसंत नाहीं. आणि तो करतो तें याला रुचत नाहीं. अशी स्थिति आज निर्माण झाली आहे. हिंदुस्थानच्या राजकारणाचा चुथडा या परस्परांतील एकजुटीच्या अभावामुळें झाला आहे हें कोणाही विचारवंताला झटकन् पटेल. आणि पुष्कळशा विचारवंतांना हें पटलेलेंही आहे पण दुराग्रहाच्या आहारीं गेल्यामुळें तें उघड मान्य करवत नाहीं अथवा कृतींत उतरवतां येत नाहीं." तो अगदीं

आवेशांत आला होता. पण तितक्यांत रस्त्यावर कसलातरी गोंधळ माजल्याचें ऐकिवांत आल्यानें त्याच्या बोलण्याला खंड पडला. वसंत आणि निर्मला दोघेही काय गोंधळ आहे हें पाहाण्यासाठीं गॅलरींत आलीं. पण तोवेळपावेतों तो गोंधळही नाहींसा झाला होता व सारें पुन्हां पहिल्यासारखें झालें होतें. वसंतानें पुन्हां बोलण्याला सुरवात केली. पण पहिल्या विषयाला खंड पडला असल्यानें आतां साहजिकपणें त्याच्या बोलण्यांत विषयांतर झालें.

"आपल्याजवळचें भांडवल वाढावें आणि आपली सुबत्ता वाढावी म्हणून मालकवर्ग व जमीनदारवर्ग मजुरांची व शेतकऱ्यांची असह्य पिळणूक करीत आहेत. त्यांची कुचंबणा होत आहे. तद्वत्, आपलें आर्थिक बल वाढावें म्हणून एक राष्ट्र-दुसऱ्या राष्ट्रावर आक्रमण करीत आहे आणि त्यांची गांजणूक करीत आहे. या सर्व जागतिक अशांततेचें प्रमुख कारण म्हणजे आर्थिक–अमानुष–हाव ! वस्तुतः पाहातां संपत्ति निर्माण करणारा वर्ग एक व त्याचा उपभोग घेणारा दुसराच ! संपत्तीचें उत्पादन आज जो वर्ग करीत असतो तो वर्ग– आज ज्यांच्या हातांत स्वनिर्मित संपत्तीचा हक्क गेला आहे त्यांच्या-मुळें अमानुष हावाखालीं स्वतः निर्धन होऊन बसला आहे. आणि हे मात्र गबर झाले आहेत. ज्यांच्या श्रमामुळें संपत्तीची निर्मिति होते, तो वर्ग सदैव लाथाडला जातो तर गरिबांना पिळून पिळून गबर बनलेले परोपजीवि लोक मात्र पैशाच्या जोरावर मानमान्यतेला चढतात. ही आजची उलट्या काळजाची समाजघटना आहे. या संपत्तीचा उपभोग सर्वांना सारखा घेतां आला पाहिजे. खासगी मालमत्ता व अनुवंशिक संपत्ति नष्ट होऊन ती सर्व राष्ट्रांत सारखी वाटतां आली

पाहिजे. आज आपल्या कित्येक देवालयांत अगणित संपत्ति अगदीं अडगळीसारखी पडून राहिली आहे. त्या दगडाच्या मूर्तीला सजविण्यांत आजचा वर्ग सार्थक मानीत आहे, पण चालत्या बोलत्या-- लाखोंनीं मोजतां येतील अशा कितीतरी मूर्ती अन्नांवाचून उपाशी मरत आहेत. त्यांच्याकडे मात्र कोणी लक्ष देण्यास तयार नाहीं. जगांत बेकारी वाढली आहे. नवे उद्योगधंदे शोधून काढण्याची आवश्यकता आहे पण भांडवलाच्या अभावीं निघूं शकत नाहीं. आपलें भांडवल आहे यांतच वाढावें, तें इतरत्र गुंतूं नये असा भांडवलदारांचा हेतू, तर बेकारीनें माणसें उपासामुळें पटापट मेलीं तरी बेहत्तर, पण देवांचे वैभव नाहींसे करतां येणार नाहीं हा दगडपूजकांचा हेतू—वस्तुतः या दोघांच्याही जवळील संपत्ति राष्ट्रानें ताब्यांत घेतली पाहिजे. तिचा योग्य उपयोग केला पाहिजे. सर्वांना तिचा सारखा उपभोग घेतां येईल असा एकादा सुव्यस्थित मार्ग शोधून तो रूढ केला पाहिजे. पण एवढं सर्व व्हायला आधीं ज्यांच्यामुळें संपत्ति निर्माण होते, तो वर्ग जागा झाला पाहिजे. त्यांनीं हालचाल केली पाहिजे. संपत्तीचे उत्पादक तेच खरे संपत्तीचे मालक अशी समजूत प्रस्थापित झाली पाहिजे. म्हणजे उद्योगी निर्धन आणि निरुद्योगी सधन, हा भेद नाहींसा होईल. आणि जो कष्ट करील तो खाईल. अशी प्रथा पडेल व तीच अंतीम सुस्थैर्याप्रत नेईल. अर्थात् यांतही अशक्यांना व दीनदुबळ्यांना कांहींतरी वाव राहावा हें योग्य आहे, पण शक्ती असूनही केवळ जन्मसिद्ध—हक्कांच्या भरंवशावर जो निरुद्योगी राहातो तो मात्र जगण्यास नालायक ठरावा ?" आज वसंताला अगदीं आवेश आला. तो आवेशाच्या भरांत बोलत होता. हिमांशूनें बरोबर पटवून दिलेलें

तत्त्व तो आतां यावेळीं व्यक्त करीत होता. तो ज्यावेळीं निर्मलेला भेटायला निघाला होता त्यावेळीं गाडींत भेटलेल्या–हिमांशूनें चाणाक्ष बुद्धीनें वसंताच्या मनाचा ठाव घेतला व वसंत आपल्या गटांत येण्यास योग्य आहे असा नक्की अंदाज करून त्यानें खडा टाकून पाहिला. तो यशस्वी झाला. हिमांशूनें नंतर त्याला आपल्याच घरीं नेलें व सारें कांहीं समजावून सांगितलें. रात्रौच्या वेळीं ते फिरायला गेले म्हणजे तो आपला उद्देश वसंताला पटवून देई आणि अखेर एके वेळीं हिमांशूनें पर्वतीच्या पायरीवरच त्याच्याकडून शपथ घेवविली. वसंतानेंही आनंदानें घेतली. त्याला त्यांचे हेतू व उद्देश पटले होते.

* * * *

रात्रीचे साडेदहा वाजून गेले. बोलण्यामुळें म्हणा अगर अती विचारामुळें म्हणा वसंताच्या मनाला जरा मोकळेपणा हवासा वाटूं लागला. तो उठला, त्यानें स्वेटर घातला, वर शर्ट घातला आणि निर्मलेला त्यानें विचारलें–" फिरायला येतेस कां जरा ? "

" कुठं जायचं इतक्या रात्रीं ? " निर्मलेनें विचारलें.

" जाऊं या जरा समुद्रकांठीं. "

निर्मलेनें विशेष आढेवढे घेतले नाहींत. तिनें तोंडावरून एकदां पाण्याचा हात फिरवला, केस हातानेंच नीट साफसूफ केले व त्याच्याबरोबर ती फिरायला निघाली.

तीं दोघेंही रस्त्याच्या कडेला बसची वाट पाहात उभीं राहिलीं.

शुक्लपक्षांतील अष्टमीचा तो दिवस होता. गगनांगणांत चंद्राची कोर हंसत होती. हवेंतील गारवा सुखद वाटत होता. रत्यावर माण-

सांची विशेष रहदारी नव्हती. तो ट्रॅमचा रस्ता नव्हता. पलीकडे मोठे पटांगण उजाड पडलें होतें. फूटपाथवर माणसें गप्पागोष्टी करीत होतीं. अष्टमीच्या धवल शीतल चांदण्याची सुषमा प्रणयी युव-युवतींच्या वृत्तींना आल्हादवीत होती. थोड्या वेळानें बस आल्यावर तीं दोघेंही बसमधून समुद्रकिनाऱ्यावर आली. चौपाटीवर अद्यापि माणसांची थोडीबहूत गर्दी होतीच. वाळूंत अगदीं पाण्याच्या शेजारच्या बाजूला तीं बसलीं. भेळ गंडेरीवाल्यांची फेरी येऊन गेली. चंपीवाले मॉलिसवाले उगाच हटकून गेले.

दूर अंतरावर—पण स्पष्ट दिसतील इतक्या··एक जोडपें बसले होतें. पेहरावावरून ती बाई धंदेवाईक असावी असें दिसत होतें. त्याच्या अगदीं शेजारीं मांडीला मांडी लावून ती बसली होती. तिच्या अंगावर पोपटी रंगाची साडी दिसत होती. त्यावेळीं चांद-ण्याच्या सौम्य प्रकाशांत त्या साडीचा पोपटी रंग उठून दिसत होता. ती कृशांगी असून सावळ्या वर्णाची होती. केशभूषा आक-र्षक अन् आधुनिक व ढंगदार पद्धतिनें केली होती. चेहरा गुब-गुबीत अन् पुष्ट दिसत होता. पावडरीमुळें मुळचा सावळावर्ण थोडासा लोपला होता आणि म्हणूनच चेहऱ्यांत आकर्षकपणा सामावला होता. त्या जोडप्यानें भेळ मागविली. इकडे वसंताला भेळ खावीशी वाटली. आजपर्यंत कधीं त्यानें भेळ खाल्ली नव्हती. त्याला आवडतही नव्हती. पण आतां उगाच त्यांचें पाहून त्याला इच्छा झाली. त्यानंतर त्यानें नारळपाणी मागवलें.

समुद्राच्या लाटा उसळत होत्या. चंद्रप्रकाशांत तें निळसर पाणी चकाकत होतें. त्याच्या उसळणाऱ्या लाटा मोत्यांच्या माळा बेफिकीर-

पणें सारख्या फेंकून द्याव्यात त्याप्रमाणें दिसत होत्या. दोघांच्या अंगावर चंद्राचा प्रकाश पडला होता. निर्मलेच्या अंगावर निळी साडी होती. त्या धवल प्रकाशांत ती निळी साडी तिच्या मुळच्या गौरमिश्रित सुंदर अंगकांतीला शोभून दिसत होती. किनार जरीची होती. पण फार बारीक होती. तरीपण ती चमकत होती. काळ्याभोर केसावर चंद्राचा प्रकाश पडल्यानें ते तकतकीत पण विलोभनीय दिसत होते.

वसंताला त्या ठिकाणीं फार वेळ बसवेना. तो उठला; त्याबरोबर निर्मलाही उठली. त्यानें अंग शहारल्यासारखें केलें. व नंतर चालूं लागला.

व्हिक्टोरिआ केली व ते परत आले.

व्हिक्टोरिआचें झापड बंद केलें होतें. वसंताच्या शेजारींच निर्मला बसली होती. निर्मलेच्या शरिराचा धक्का त्याला अनेक वेळां लागला. त्या धक्क्यानें त्याचें शरीर शहारे व रोमांच उठत सर्वांगावर ! त्याच्या नेत्रांत अतृप्त प्रणयाचा हव्यास सामावला. वृत्ती धुंद झाल्या. त्या धुंद अन् बेहोष स्थितींत त्यानें तिचा हात धरला.

तितक्यांत अपेक्षित ठिकाणीं व्हिक्टोरीआ उभी राहिली. तीं दोघेही उतरलीं. अन् खोलींत परत आलीं.

त्या धुंद मादक वातावरणाचा परिणाम वसंताच्या—निर्मलेच्याही —मनावर झाला.

रात्रीं साधारण साडे अकरा बारा वाजतां तीं परत आलीं होतीं. पडल्याबरोबर झोंप लागली दोघांनाही. वसंतानें तिला निराळा बिछाना दिला व स्वतः बाहेर गॅलरींत येऊन झोपला.

रात्रौ दीड वाजतां वसंत बिछान्यावरच उठून बसला.

खोलीच्या दाराशीं उसें ठेवून निर्मलेनें आपला बिछाना घातला होता. निर्मलाही बिछान्यावर त्याच वेळीं उठून बसली.

हा योगायोग नव्हे; सहसंवेदना असाव्यात.

तिचे केस विस्कटले होते, ते तिच्या फुगीर झांकत्या डोळ्यांवर आले होते. डाव्या खांद्यावरचा पदर पार नाहींसा झाला होता. पुष्ट, गुबगुबीत मांसल दंड स्पष्ट दिसत होते. गालांवर आरक्तता द्विगुणित झाली होती.

वसंताच्या चेहऱ्यांत मादकता दिसत होती. कैफानें तो बेहोष झाला होता. डोळे अर्धवट उघडे होते. पण बुबळे दिसत नव्हतीं.

त्यानें आपले हात पुढे केले. तिच्या दोन्हीं गालांवर ते अचानक पडले. त्यानें ते कांहींसे दाबले व जवळ ओढून तिच्या रक्तवर्ण ओठांवर आपले ओठ ठेवले. त्यानें तिच्या ओठाचें दीर्घ–भरीव चुंबन घेतलें. पण नंतर काढले–हलकेंच तो बाजूला झाला. त्याच्या चेहऱ्यांतील भावमधुरता अन् मादकता कमी झाली. त्या ठिकाणीं भयमिश्रित भेसुरता सामावली. तो बोलूं लागला.—

"छे–मी चुकलों. निमा–निमा–क्षमा कर मला. तुझ्या सान्निध्याची, सहवासाची तळमळ आहे माझ्या मनाला, तुझ्यावर माझं असीम प्रेम आहे, पण–पण निमा, आपल्या प्रेमाची पूर्तता या जन्मांत, तरी होणें शक्य दिसत नाहीं. उद्यां कदाचित् मी सांपडेन–मला पकडतील–तुरुंगांत घालतील–फासावरही लटकवितील.–निमा–मी खुनी आहे. —"

निमाला त्याचें हें बोलणें ऐकूं येत होतें काय ?

आणि तो तरी शुद्धींत बोलत होता काय ?

छे ! ते दोघेही स्वप्नांत होते.

पण चुंबनाची कृति मात्र घडून आली खरी प्रत्यक्षच !

* * * *

पहांटे सहा वाजतां निर्मला जागी झाली. तिनें डोळयावरून हात फिरवला. नंतर तिनें वसंताकडे पाहिलं. तो झोंपला होता. तिला कसलीशी स्मृति झाली. तिनें आपल्या दोन्ही गालांवरून हात फिरवले. ओठावरूनही हात फिरवला—पुन्हां एकदां वसंताकडे दृष्टी फिरवली अन् नंतर ती स्वतःशींच हंसली. छे, स्वप्न होतं तें याची खात्री झाली तिला.



## ९ सुहास ?

रविवारचा दिवस होता. गिरणीला सुट्टी होती. वसंत आज घरींच होता. दुपारीं जेवण झाल्यावर त्याला सुस्ती आली म्हणून तो झोंपला होता. निर्मला मात्र टेबलाशीं बसून पत्र लिहीत होती. वसंताचें भीतियुक्त पत्र पाहून ती भेदरली होती व तत्काल ती तें पत्र पाहातांच मुंबईला आली होती. ती मुंबईला आली आहे हें फक्त विभाकरालाच माहीत होतें. विभाकरानें नंतर घरीं सर्वांना कळविलें असलें, तरी आपण स्वतः पुन्हां पत्रानें योग्य खुलासा करणें इष्ट आहे असें वाटल्यावरून आज ती आपल्या वडिलांना पत्र लिहीत होती.

तिनें पत्र पुरें केलें. घडी करून पाकिटांत घातलें व पोष्टांत टाकण्यासाठीं ती खोलीबाहेर पडली.

वसंताची झोंप नीटशी झाली नाहीं. तो खडबडून उठला. त्याला स्वप्न पडलें होतें.

'अमावास्येची काळीकुट्ट रात्र आहे. आपण समुद्राकिनारीं बसलों आहोंत. आकाशांत तारकांचें भरगच्च जाळें विणलें आहे. त्या तारका संपूर्ण तेजानें तळपत असूनही केवळ चंद्राविना त्यांचा प्रकाश पृथ्वीवर पोहोंचण्यास असमर्थ होता. एक एक तारा मनाशीं मोजीत पायां-खालील वाळवंट तुडवीत चाललों आहों. अशावेळीं समोरून एक युवती येते. बहुधा ती निर्मलाच असावी. आपण आसावल्या नजरेनें त्या युवतीकडे पाहिलें. आवशानें हात पुढें केलें. त्या युवतीनें आपले हात निःसंकोचपणें आपल्या हातांत दिले. त्या कोमल—लांबसडक—थंडगार बोटांच्या स्पर्शानें आपल्या वृत्ती थरारल्या. युवतीचा चेहरा लज्जेनें अवनत झाला आहे. आपण ते हात छातीशीं भिडवले अन् अशापूर्ण नजरेनें वर पाहिलें. आकाशांत एक तारा क्षितिजापर्यंत पळत गेला अन् तुटला. इकडे पाण्याची लाट आली. त्या लाटेंत आपण हातांत हात घेऊन उभे होतों. ती युवती वाहात गेली. बुडाली. क्षणांत अदृश्य झाली. आपण मात्र आहों त्याच जागीं विषण्ण अन् भांबावल्या वृत्तीनें उभें आहों—'असं तें स्वप्न होतं.

त्यानें चहूंकडे नजर न्याहाळली. वस्तुस्थितीची जाणीव झाल्या-वर तो उठला. त्यानें तोंडावरून पाण्याचा हात फिरवला.

पोष्टांत पत्र टाकायला गेलेली निर्मला परत आली. त्यानें निर्म-

ळेकडे पाहिलें. निर्मलेला. वाटलं, बहुधा हा आतां 'कुठें गेली होतीस ?' असं विचारणार. तिनें त्याला सांगितलें सारें कांहीं.

वसंतानें स्टोव्ह पुढें घेतला. स्पिरीटची बाटली काढली.

निर्मलेनें त्याच्या हांतून स्पिरीटची बाटली घेतली. व स्वतः स्टोव्ह पेटविण्यास सुरवात केली.

"निमा—" तिच्या दृष्टीशीं दृष्टी भिडवीत तो कारूण्यपूर्ण स्वरांत बोलूं लागला. "निमा, तुझ्यावर माझं निस्सीम प्रेम आहे. तुझ्या सान्निध्याची मला अमूप हांव आहे. पण कां, कोण जाणे; आपल्या कपाळीं सहजीवनाचं सुख नसावं असा माझा दृढ समज झाला आहे. तुला आठवते आहे 'शाप' मधील माडखोलकरांची कविता ?–तिच्यांतला प्रत्येक चरण आज मला आठवतो आहे–त्रस्त करतो आहे." आणि असं म्हणून त्यानें शांत मोकळ्या आवाजांत ती कविता म्हणण्यास सुरवात केली.

'मी सांगु कुणाला बोलुं कुणाशीं सखे
जे विचार माझ्या हृदया जाळिति एकसारखे
तव दर्शन करितें लोल मनाला जरी
येतांच परी तुजपाशीं मीनाक्षी बुजे वैखरी
मी घेउनि हातीं हात तुझा बैसतों
ओताया हृद्गत सारें तुजपुढें जीव नाचतो
परि लोचन तव हे दर्पोद्धत मानिनी
भिडतांच दृष्टिला माझ्या जातसे चित्त विरमुनी
कोणता भाव हा तुजा
डोकावे नयनीं तुझ्या ?

**कां होतों आपण परस्परां पारखे ?**

**कोणत्या जन्मिचें येतें हें मधें आपल्या धुकें ?**

**मी बोलु कुणाशीं—॥ १ ॥"**

त्याच्या तोंडून कवितेचे स्वर बाहेर पडत होते. कविता म्हणतां-नाच वसंतानें निर्मलेचे दोन्ही हात आपल्या हातांत घेतले होते व अत्यंत भावपूर्ण नजरेनें तिच्याकडे पाहात तो कविता म्हणत होता.

निर्मलेला वाटलं—प्रखर शस्त्रांचा मारा आपल्या काळजावर होत आहे.

तिचा चेहरा कारुण्यपूर्ण भावांनें म्लान झाला. तिच्या नेत्रांत अश्रू तरळले. वसंताच्या हातांत दोन्हीं हात होते ते सोडवून घ्यावेत व अश्रू पुसावेत असं मुळींसुद्धां निर्मलेला वाटलं नाहीं. तसं वाटण्याइतक्या भानावर ती नव्हती. पापण्या ओलसर झाल्या होत्या. ओठ थररत होते. हात कापत होते.

तिचे कंपित हात त्यानें अधिक दाबले. जवळ ओढले. नंतर हात सोडले. आणि आपल्या दोन्हीं हातांनीं त्यानें तिचे मस्तक धरलें. तें वर उचलून तिच्या तरळत्या भावसंमिश्र दृष्टीशीं दृष्टी भिडवली. क्षणभर स्थिरावून नंतर तिचें मस्तक अधिक जवळ ओढून त्यानें तिच्या थरथरत्या ओठांवर आपले ओठ ठेवले. काढले. पुन्हां ठेवलें.

"बोल, निमा, मी गेलों—दूर—दूर गेलों. प्रतिकूल परिस्थितीनें मला तुझ्यापसून दूर ओढून नेलं तर तूं मला विसरणार नाहींस ना ?—तुझें प्रेम—नव्हे; तुझ्या प्रेमाची स्मृति—हीच मला माझ्या

पुढील जीवनांत आतां सुखावह आहे. बोल, माझ्यावरील तुझें प्रेम अढळ राहील ना? निमा, लग्न न करण्याची मी शपथ घेतली नाहीं. तुला तसं कळवलं याचं कारण निराळं होतं–आहेही! तरीही पण लग्न करतां येणं शक्य व्हायचं नाहीं माझ्यानं! तूं लग्नाला तयार होशील–आहेसही. पण लग्नानें आपण सुखी होणं शक्य नाहीं. मी स्वतः होऊन माझ्याभोवतीं आग पेटविली आहे. ही आग भडकेल केव्हां याचा नेम नाहीं. ती भडकली म्हणजे माझं सर्वस्व संपलंच! दधीची ऋषीप्रमाणें मी माझी चिता स्वतःच्याच हातानें पेटविली आहे. हिच्या ज्वाळा उफाळल्या म्हणजे या वंसताचा राईएवढासुद्धां तुकडा दिसणें अशक्य होईल. निमा, माझ्याबरोबर तूं दुःखाच्या खाईत पडावीस असं मला प्रामाणिकपणें वाटत नाहीं. तूं तुझं स्वतःचं जीवन तुझ्या हृत्संकेतानुसार खुशाल व्यतीत कर. वाटलं, लग्नाशिवाय राहा; वाटलं, लग्न करून घे. त्याबद्दल माझं कांहींच म्हणणं नाहीं. मागणं आहे तें फक्त एकच, कीं माझ्या वेड्या प्रीतीची स्मृति तुझ्या अंतर्यामांत सदैव जागृत असूं दे. माझी ही इच्छा होईल ना पुरी?" त्यानें तिचें मस्तक सोडलें नव्हतें. तें तसेच आपल्या हातांत धरून तो तिच्याकडे न्याहाळून पाहात बोलत होता.

"वसंत, आपण काय बोलतां आहांत हेंच मला नीटसं समजलं नाहीं. माझी आपणांवरील प्रीत अखंड आहे, अभेद्य आहे. आपल्या नयनांतील निरांजनांनीं माझ्या अंतर्यामांत प्रकाश पाडला आहे. हा प्रकाश न लोपणारा आहे. आपल्या प्रीत–किरणांनीं माझ्या हृदयांतील निरांजनं पेटविलीं आहेत. प्रीति! प्रीति ही इतकी प्रभावी

शक्ति असते, कीं तिच्या चैतन्यवन्हींत बाकीच्या साऱ्या भावना जळून खाक होतात—नामशेष होतात. माझी आपणांवरील प्रीत ही या थरापर्यंत पोहोंचली आहे. मी आपणांला कधींही विसरणार नाहीं. तसले अभद्र शब्दही मी आपणांला उच्चारूं देणार नाहीं."

" बस्स ! मला हेंच पाहिजे होतं. आतां आपण चहा घेऊं या." असं म्हणून त्यानें स्टोव्हवरील उकळत्या पाण्यांत चहाची पावडर टाकली. चहा तयार झाल्यावर त्यानें दोन्हीं कपांत ओतला. दोघांनींही घेतला.

चहा पिऊन उठतात तों विभाकर वळकटी घेऊन खोलींत येतो आहेसें त्यांना दिसलें.

* * * *

वेळ रात्रीची होती. वसंत आणि विभाकर बाहेर गेले होते. खोलींत एकटी निर्मला होती. विभाकर असा अचानक मुंबईला कां आला हें निर्मलेला अद्यापि कळलें नव्हतें. त्यानेंही त्याची वाच्यता केली नाहीं.

निर्मलेला करमेना. दुपारच्या प्रसंगानें तर ती भांबावून गेली होती. त्याच विभ्रम स्थितींत ती आतांपर्यंत होती. तिनें खिडकी-जवळ खुर्ची ओढून घेतली अन् बाहेर रस्त्यावरील हालचाल पाहूं लागली. त्यांतही तिला कांहीं वाटेनासें झालें. ती तिथून उठली. कांहीं वाचायला आहे कां हें पाहाण्यासाठीं तिनें टेबलाचा ड्रॉवर उघडला. त्यांत तिला एक छोटीशी वही—नोटबुक—सांपडली. उगाच—सहज म्हणून—तिनें ही वही चाळली. अक्षर वसंताचं होतं. तिचं कुतुहल वाढलं. तिनें पहिलं पान वाचलं.—

'...मला जें बोलून दाखवतां येत नाहीं–शब्दानेंच नव्हे, तर कृतीनेंही व्यक्तवितां येत नाहीं तें मी यांत खरडलं आहे. मला कांहीं सांगायचं आहे, लोकांनीं तें ऐकावं अगर वाचावं असा माझा लिहिण्यांतला उद्देश नाहीं. माझ्या कल्पनेचा हा फुलोरा माझ्या आत्म्याच्या रंजनासाठीं–प्रतीतीसाठीं–अन् विकासासाठीं आहे. हें वाचून कुणी हंसेल–रडेल! कुणाला आनंद वाटेल, कुणाला वाईट वाटेल! पण मला त्याची पर्वा नाहीं. माझ्या मनींच्या आशा–आकांक्षा–माझीं स्वप्नं–यांचीच इमारत मी शब्दांनीं उठविली आहे. यांतल्या आशा–आकांक्षांच्या विटा, स्वप्नांचा चुना–अद्याप तयार व्हायचा आहे हा रांधा! तो माझ्या जीवनांतला अपुरा रांधाच मी केवळ माझ्या कल्पनेनं पुरा केला आहे. तो अपुरा राहाणार हें मी जाणून आहे. आणि ही जाणीव आहे म्हणूनच तो या वहींत शब्दावडंबरांनीं पुरा करण्याची इच्छा अनिवार झाली. या अनिवार इच्छेच्या आहारीं जाऊन मी हें लिहिलं आहे. अर्थात् जें आहे तें माझ्या स्वतःसाठीं आहे, दुसऱ्या कुणाहीसाठीं नाहीं.'

सारीच वही वाचून काढावी अशी तिची आशा बळावली. तिनें खिडकीजवळील खुर्ची टेबलाजवळ ओढून घेतली.

खालीं वसंत बोलत होता. वसंताचा शब्द ऐकला. तिनें वही मिटली. होती त्याच ठिकाणीं पुन्हां ठेवून दिली.

वसंत, विभाकर आणि सुहास तिघेही आंत आले.

* * * *

सुहासचा पैशाचा हव्यास वाढला. अतिरेकाला गेला.

सुहास संगीताचें शिक्षण घेतच होती. आतां ती बहुतेक बऱ्यापैकीं गात होती. तिचा आवाज सुरेल नव्हता, पण बराचसा मधुर होता.

रत्ना ज्या शिक्षकाकडे संगिताचें शिक्षण घेत होती, त्याच शिक्षकाकडे सुहासही शिकत होती.

सुहास फक्त गायनच शिकत होती पण रत्ना नृत्यही शिकत होती. नृत्याबद्दल सुहासनें कधीं नापसंती व्यक्तविली नाहीं पण स्वतः मात्र कधीं शिकली नाहीं.

सुहासनें वृत्तपत्रांतले जाड टाईपांतले मथळे वाचले. तिला धक्का बसला—तिनें आपल्या आईला तें सारें वाचून दाखविलें. आणि 'आतां तुझ्या वचनांतून सुटलें. माझें बंधन तुटलें. मी आतां स्वतंत्र झालें.' असं म्हणून तिनें मंगळसूत्र तोडलें. कुंकू पुसलें. सुहास विधवा झाली. ती परित्यक्ता होती. तिच्या पतीचें नांव रावबहादूर प्रणयपूरकर ! त्यांच्या खुनाची बातमी होती ती.

सुहासचे त्या स्थितींत पांच सहा दिवस गेले. त्यानंतर तिनें कांहींशी खटपट केली. तिच्या खटपटीला यश आलें. दहा दिवस जाऊं दिल्यानंतर ती बाहेर पडली. आपलें सामान बांधले. फक्त आईला 'मी मुंबईला जातें आहे' असं तिनें सांगितलें व आई 'नको—नको' म्हणत असतांही तिनें गाडींत पाऊल ठेवलें.

विभाकराला तें नंतर कळलं. तोही तिच्या पाठोपाठ मुंबईला धांवून आला.

* * * *

"आपणांवर माझं प्रेम आहे असं आपणांला वाटत असेल तर

ती साफ खोटी गोष्ट आहे. स्पष्ट बोलतें याबद्दल माफ करा. आणि माझा नाद सोडून आपण परत जा कसे!"

"माझं तुझ्यावर प्रेम आहेच असं नाहीं. मीही स्पष्ट बोलतों याबद्दल तूं माफ कर. तुझ्यापेक्षां रत्नाच मला अधिक आकर्षक दिसते. पण तुम्हां दोघींशींही मी जसा नाजूक धाग्यानं बांधला गेलों तसा तीं बंधनं तोडूनही टाकूं शकतों. तुझ्यावरील प्रेमानं मी येथपर्यंत आलों असं तूं समजूं नकोस. तिकडे तुझ्या आईनं अंथरूण धरलं आहे. तुझा तिला ध्यास लागला आहे. तिच्यासाठीं मी तुझ्याकडे धांव घेतली. माझ्यासाठीं नव्हे, तर तुझ्या आईसाठीं तरी तूं परत चल."

"आईविषयीं मला अतोनात ममत्व आहे. तिच्यावर माझं अलोट प्रेम आहे, पण तेवढ्यासाठीं आतां मी परत येऊं शकत नाहीं. मी पापी आहे. पूर्वीपेक्षांही मी जास्त पापी झालें आहे. माझ्या पवित्र अन् सच्छील आईपुढं आतां मला उभं राहायला शरम वाटते आहे. मी जें पाप केलें आहे आणि करीत आहे त्याची पूर्ण जाणीव माझ्या मनाला आहे. आणि असं असूनसुद्धां मी पुन्हां त्याच पापाला प्रवृत्त होत आहे. पण त्याच्या बुडाशीं अन्य कारण आहे. त्या कारणांची पूर्तता होईपर्यंत मी या पापांतच खितपत पडणार. आज मी पापी आहे याची नीटशी जाणीव इतरांना नसेल,–ती होईल. पण आजची ही जाणीव उद्यां नाहींशी होईल. ती नाहींशी झालेली आपण पहाल. माझी आई अत्यवस्थ आहे म्हणतां; तिला भेटावं असं वाटतं. आतां फारतर या महिन्याची ती सोबतीण आहे. तिच्या अखेरच्या दिवसांत मी

तिच्याजवळ असावं हें योग्य आहे. पण ही माझी पापी मूर्ति तिच्या अखेरच्या दिवसांत तिच्यापुढें असूं नये हें त्याहीपेक्षां जास्त योग्य आहे. मी निष्ठुर आहे असं कुणाला वाटेल. मी तरी कशाला नाहीं म्हणूं ? निष्ठुर आहे. आणि आहे त्यापेक्षांही जास्त होणार आहे. आपण खुशाल परत जा. मी येऊं शकत नाहीं. आपणांला मजविषयीं कांहीं वाटतच असेल तर माझ्या धाकट्या भावाला सांभाळा. त्याला नीट नांवलौकिकाला आणा आणि कधींकाळीं आलांतच मुंबईला तर माझी भेट घेतल्याशिवाय अन् भावाची खुशाली सांगितल्याशिवाय परत जाऊं नका हीच विनंति." असं म्हणून सुहास उठली. खोलीबाहेर पडली. गेली–निघून गेली.

विभाकर तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे मंत्रमुग्धतेनें पाहातच राहिला.

* * * *

गांवांतलं तें प्रसिद्ध अन् प्रमुख हॉटेल होतं. त्यांत 'आदर्श चित्र संस्था' नांवाच्या फिल्मकंपनीचे डायरेक्टर उतरले होते. सुहासला बातमी लागली. त्यांच्या गळ्यांत विमाकंपनीची पॉलिसी टाकावी या हेतूनें ती त्यांना भेटायला गेली. भेटली.

दोन तीन दिवस खेपा घातल्या. डायरेक्टरांनीं तिच्या इच्छेचा स्वीकार केला. पण एका अटीवर !

त्या अटीच्या पूर्ततेसाठीं सुहास आज त्यांच्याच कंपनींत नटी म्हणून नोकरीसाठीं आली आहे.

सुहास मुंबईंत सिनेमा नटी म्हणून आली.

* * * *

आपल्या आईला पाहातांच सुहास अशी एकदम बेशुद्ध कां पडली, आणि आपल्या आईचं नांव कमलबेन असतां सुहासनें तिला ‘ शकुंतलाबाई ’ कां म्हणावें याचं कोडं रत्नाला सुटेना ! त्याक्षणीं तर ती पूर्ण भांबावून गेली. एकीकडे सुहासला शुद्धीवर आणण्याची खटपट, तर एकीकडे झालेल्या घटनांचे मस्तकांत चालू असलेले विचारचक्र !

बराच वेळ विचार केल्यानंतर तिला कसलीशी आठवण झाली. रात्रौ जेवण झाल्यानंतर जेव्हां ती आपल्या खोलींत आली तेव्हां तिनें आपली ट्रंक उघडली. त्यांतून तिनें लठ्ठशी वही काढली.

कांहीं दिवसांपूर्वी रत्नाच्या आईनें जी वही रत्नाला दिली होती तीच ती वही ! आपल्या आईचं आयुष्य चमत्कारिक परिस्थितींत गेलं आहे एवढाच रत्नाला ती वही हातांत पडल्यावेळीं बोध झाला होता. त्यानंतर ती वही आपण वाचून पाहावी अन् आईच्या आयुष्यांतला पिंजलेला धागा न् धागा आपण उकलावा असं तिला मुळींच वाटलं नाहीं. विभाकरानें जें तोंडसुख घेतलं तें खरोखरीच सत्याला धरून घेतलं, कीं उगाच कांहींतरी बोलून गेला तो याचीच खात्री पटवून घेण्यासाठीं ती आपल्या आईकडे गेली. पण कांहींच न बोलतां ज्यावेळीं आईनें वही हातावर ठेवली, त्यावेळीं तिला आईच्या हांतून नक्की कांहींतरी प्रमाद घडून आला आहे याची जाणीव झाली. आणि ही जाणीव झाली म्हणूनच तिनें वही वाचण्याची टाळाटाळ केली.

पण आतां मात्र तिला वही वाचून पाहावी अशी उत्कंठा लागली, तिनें वही उघडली.—

' घरची गरीबी. नुक्तीच विधवा झालेली असहाय अबला मी ! सहानुभूतीच्या शब्दासाठीं तर नव्हेच नव्हे, पण प्रत्यही उणीं-दुणीं काढून अंतःकरणाचा लचका घेण्यासाठींच नातेवाअीकांचा जमाव मला त्रस्तवूं लागला.

शिक्षण थोडं बहुत झालेलं. दुसऱ्याचीं धुणीं-भांडीं करून त्यावर गुजराण करण्यापेक्षां नर्स किंवा मास्तरीण होतां येईल कां, याचा मी विचार करूं लागले अन् एकदां प्रयत्न तरी करून पाहूं असं ठरवून मी एक अर्ज खरडला व तो घेऊन रावबहादुरांच्या घरीं गेलें....?

त्यावेळीं माझ्याकडे पहिली इयत्ता होती. वर्गाला दोन दरवाजे होते. मागील दरवाजा उघडला म्हणजे शाळेच्या मागील सार्वजनिक बागेंत जातां येतं. रावबहादूर त्यावेळीं ऑनररी मॅजिस्ट्रेट होते. ऑनररी मॅजिस्ट्रेटांचं ऑफिस त्या सार्वजनिक बागेंत होतं. माझ्या वर्गाचा मागील दरवाजा उघडला म्हणजे नेमकं समोरच्या जागेंत, वर्गाकडेच तोंड करून बसलेले रावबहादूर दिसत. मी दररोज तो दरवाजा उघडा ठेवून त्या ठिकाणीं खुर्ची मांडून बसे. आणि तिथं बसून मुलींना शिकवीत असे. थोरल्या बाईंनीं अनेक वेळां हरकत घेतली, पण मी त्यांना दाद दिली नाहीं. मी तो दरवाजा उघडून बसे, तें काय माझ्यासाठीं ?

माझे पती वारले. पतीपासून मिळणारं सुख पुरतं एक आठ-वडाभरही लाभलं नाहीं मला. त्यानंतर पतीच्या शिलकीवर कसंबसं एक वर्ष निभावून नेतां आलं. पुढें पोटाची पंचाईत पडली म्हणून नोकरी धरली.

तारुण्य! यौवनांतला सळसळता उन्माद! मोकाट वातावरण! आणि न उपभोगलेल्या सुखाचा हव्यास!

त्या हव्यासाची पूर्तता—???

माझ्या घरीं रोज रावबहादूर येत. मलाही त्यांत कांहीं वाटेनासं झालं. मी खुलेपणानं त्यांना येऊं देई. माझं रावबहादुरांवर प्रेम जडलं होतं. त्यांचं माझ्यावर होतं किंवा नाहीं कोण जाणे.

पण अखेर एकदां रोजचा लपंडाव उघडकीला येणार याची आम्हां दोघांनाही खात्री झाली. मी साहजिकच घाबरले. त्यांनीं धीर दिला.

त्यानंतर त्यांनीं मला मुंबईत आणलं. तेथल्या एका आश्रमांत माझी सोय केली आणि स्वतः निघून गेले.

मी मूल घेऊन सोलापुरीं गेलें. त्यावेळींसुद्धां मी त्या आश्रमांतून मोठ्या मुष्कीलीनेंच निसटलें होतें. सोलापुरीं माझी बहीण होती. तिच्या पायावर डोकं ठेवलं. निःसंकोचानं सारा लाजिरवाणा प्रकार तिला सांगितला आणि मूल तिच्याजवळ ठेवून परत गांवीं आलें. रावबहादुरांची भेट घेतली. पण त्यावेळीं 'नोकरी देतां येणार नाहीं' असं त्यांनीं मला निक्षून सांगितलं. माझ्या डोळ्यांपुढें भरदिवसां काजवे चमचमूं लागले. मस्तक सुन्न झालं.

अशा त्या हतबल अवस्थेंत पुढें काय करूं हेंच सुचेना. शेवटीं मुंबईतच जावं आणि तिथें कुठेंतरी नोकरीची खटपट करून पाहावी, असा निश्चय केला. आणि मुंबईला येण्यापुरते लागणारे भाड्याचे पैसे रावबहादुरांजवळून घेतले व मुंबईला आले.

गाडींत एक अगदीं सभ्य अन् सज्जन असा इसम होता. त्याचा तो सात्रपणा पाहूनच त्याला मी मुंबईची माहिती विचारली व माझा आशयही व्यक्तविला. त्या इसमानें मुंबईत उतरण्याची सोय करतो असें अश्वासनही दिलें. त्याचं अश्वासन ऐकून, माझ्या असहाय स्थितींत मला तो एक देवमाणूस भेटला असंच वाटलं आणि मुका-ट्यानें त्याच्याबरोबर गेलें. त्यानें एका म्हाताऱ्याबाईकडे माझी उतरण्याची सोय केली आणि 'येऊन भेटत जाईन केव्हां केव्हां—' असं म्हणून निघून गेला.

सायंकाळीं पांच वाजल्यानंतर तिच्या घरीं मुलीं यायला लागल्या. त्यापैकीं कांहीं चांगल्या घराण्यांतल्या होत्या तर कांहीं अगदींच शीलहीन दिसत होत्या. त्या मुलींकडे पाहून माझ्या मनांत चमत्कारिक विचार यायचे. मी त्या म्हाताऱ्याबाईला तसं विचारलं देखील.

त्या बाईचं घर बरंच मोठं होतं. खोल्या खोल्या बऱ्याच होत्या. हावेळपावेतों मला तें कांहीं माहीत नव्हतं. त्या मुलींच्यानंतर त्या बाईकडे बरेच पुरुषही आले आणि—!

सारा किळसवाणा प्रकार कळून आला मला त्यावेळीं. मी कुठें येऊन पडलें याची जाणीव झाली. अन् त्या सज्जनाचा सज्जन ( ! ) पणा कळून आला. सायंकाळीं सातनंतर ज्यांनीं मला इथं आणून सोडलं तो इसम आला. मला त्या म्हाताऱ्याबाओीनं आधींच नीटशी कल्पना दिली होती. आणि थोडीशी धमकीही दिली होती. मी तर काय, त्यावेळीं अगदींच संपूर्णपणें असहाय बनलें होतें. नाइलाज झाला माझा.

त्यानंतर मी त्या बाईच्या घरीं तीन महिनेपर्यंत होते. एके दिवशीं एक रंगेल हौशी तरूण तिथं आला. त्यानें मला पसंत केलं. आणि त्या दिवशीं त्या एकांतांत त्यानें मला कायमचं ठेवून घेण्याचं अश्वासन दिलं. मीही तिथल्या कृत्याला विटले होतेंच. मी एकदम तयार झालें. आणि दुसऱ्याच दिवशीं त्याच्या मित्राच्या सहाय्यानें तिथून पाय बाहेर काढला.

तेच ते हे मोहनशेट !

रत्ना—तुझा जन्म त्यानंतर आठ महिन्यांनीं झाला. मोहनशेटच्या घरीं सारी व्यवस्था झाली. तुझ्या बाळंतपणानंतर डॉक्टरकडून कायमच्या निर्धास्ताची सोय करून घेतली.

आतां अद्यापपावेतों मी मोहनशेटकडेच आहे. अशा बाहेरख्याली माणसांतही कांहींतरी माणुसकी असते हें मला कळून आलं. माझं पहिलं नांव शकुंतला होतं तें बदलून मी या घरांत 'कमलाबेन' या नांवानं वावरूं लागलें. मोहनशेटनं अगदीं प्रेमळपणानं अन् प्रामाणिकपणानं मला वागवलं. लहर आली म्हणजे ते बाहेरही जातात. मीही कधीं त्यांना हरकत घेत नाहीं.'

* * * *

रत्नानें वरवर चाळली होती वही. पुढंही बरंचही लिहिलं होतं. तेंही वाचावंस वाटलं रत्नाला. पण पुढें पुढें मोहनशेटच्या घरचीच बरीचशी हकीकत दिसली म्हणून तिनें वही मिटली.

* * *

वहीचें वाचन झाल्यावर रत्नानें आईला बोलावून घेतलं आणि सुहास अशी बेशुद्ध कां पडली याबद्दल विचारलं.

“ सुहास ही त्या रावबहादुरांची बायको–रावबहादुरांचा आणि माझा जो अनैतिक संबंध होता तो तिच्या नजरेला आला. त्याबद्दल तिनें रावबहादुरांची बरीचशी हजेरी घेतली म्हणे–मला मात्र तसं कांहीं प्रत्यक्ष कळलं नाहीं. आणि अखेरीस एकदां रावबहादुरांनींच मला राजरोस घरीं नेलं व सुहासला माहेरीं नेऊन सोडलं ” असं तिनं रत्नाला सांगितलं.

अशी कांहींशी त्रोटक हकीकत रत्नाला कळली.

* * * *

मुंबईत सिनेमाकंपनींत ज्या दिवशीं सुहासनें पाऊल ठेवलें त्या दिवशीं सुहासनें आपल्या डायरींत लिहून ठेवलें—

“ सिनेमा नटी ! तत्काल फलदायी असा हा धंदा ! पैसा आणि कीर्ति या दोन्हीं देवता सिनेमा नटींच्यापुढें हात जोडून उभ्या असतात. मला पैसा हवा आहे. फार नाहीं–सासरीं जेवढी श्रीमंती आहे, तेवढी श्रीमंती मला लाभली म्हणजे पुरे आहे !

पतीनें, आणि सासरच्या साऱ्यांनींच मला नेहमीं नेहमीं ‘ गरिबाची ’ म्हणून हिणवावं–माझा पाणउतारा करावा. पण मी सारं तें त्यावेळीं सहन केलं. त्याचं उट्ट आतां काढणार.

शकुंतलाबाई थरकत नांवाच्या मास्तरीणबाईंना ते घरीं आणूं लागले. तसं त्यांना मी बोलूनही दाखवलं. पण उलट त्यांनींच माझी अवहेलना केली. आणि बाबा आजारी असतांना त्यांनीं मला माहेरीं आणून सोडलं, त्यावेळींच पुन्हां परत येऊं नकोस असं बजावलं.

'गरीब—गरीब—' अशी प्रत्यही विटंबना करून घ्यायला मलाही नकोच वाटलं. त्यावेळीं माझं वय फारतर पंधरासोळा वर्षांचं असेल. त्यानंतर मी शाळेंत शिकायला आरंभ केला. आईनें खाना-वळ घालून खर्च करायला सुरवात केली. मी मॅट्रिकमध्यें गेलें त्यावेळीं—म्हणजे गेल्यावर्षी—माझं वय अठ्ठावीस किंवा एकोणतीस असेल. माझ्याबरोबर सतरा अठरा वर्षांच्या बऱ्याच मुली शिकत—त्यांतच रत्ना पण होती. परवां जेव्हां तिच्या घरीं गेलें त्यावेळीं ही रत्ना कोणाची कोण याची माहिती झाली मला.



# १० हिमांशु

नाहीं, आई, मी तुला पापी कधींही म्हणणार नाहीं. तूं पापी नाहींस. मला मावशींकडून सारं कांहीं समजलं आहे. चांगल्या घराण्यांत जन्म झाला असूनही तुला हीन अशा वेश्या-वृत्तीचा अवलंब करावा लागला याचा दोष तुझ्याकडे नसून, ज्या समाजरचनेंत साधी माणुसकीही शिल्लक राहिलेली नाहीं, त्या या समाजरचनेकडे आहे. मूठभर श्रीमंतांच्या मिरासदारी जीवनांत विलासी वृत्तीची पूर्तता करण्यासाठीं समाजांतल्या कांहीं स्त्रियांना आपल्या शरिराचा विक्रय करावा लागतो. तुला चांगल्या तऱ्हेनें जगतां आलं नसतं कां ? पण आजच्या समाजघटनेंत स्त्रियांना अद्याप आर्थिक स्वातंत्र्याचा समानहक्क मिळालेला नाहीं. स्त्रियांच्या आर्थिक स्वातंत्र्याची

सूत्रें जोंपर्यंत समाजांतल्या झब्बू पुरुषांच्या हातांत आहेत तोंपर्यंत स्त्रियांच्या आर्थिक स्वातंत्र्याचा प्रश्न समाधानकारकतेनें सुटूं शकणार नाहीं. ज्या समाजांत आपल्या शीलाला शाबूत ठेवून स्त्रीला जगतां येत नाहीं तो समाज सडलेला—अतएव त्याज्यच आहे असें कां म्हणूं नये.

आपल्या पावित्र्याचा बोजवारा वाजला, आतां तो चव्हाट्यावर येणार या भीतीनें तूं गांवांतून पळ काढलास ! पण ज्या पावित्र्याची तुला भीति वाटली त्या पावित्र्याचा पडद्याआडून पदोपदीं खून होत आहे. सक्तीनें लादलेल्या पातिव्रत्यापेक्षां स्व—इच्छेनें स्वीकारलेलें पातिव्रत्यच अधिक श्रेष्ठ अन् उच्च आहे. तुझी रावबहादुरांशीं पातिव्रत्यानें राहाण्याची इच्छा होती. पण तूं विधवा स्त्री—तुझं पातिव्रत्य —!!! जर तुला रावबहादूरांसमवेत राजरोस-पणें राहातां आलं असतं, तर तुला गांवांतून पळ काढण्याचें कांहींच कारण नव्हतें. पण प्रचलित नीतीला तें सुसह्य होणें शक्य झालें नसतें. आपल्या समाजांतली ही विकृत स्वरूपाची विवाहपद्धति पूर्णपणें बदलली पाहिजे किंवा नष्ट तरी झाली पाहिजे. स्त्री ही पत्नीपेक्षां माताच समजली जाणें सर्वस्वीं इष्ट आहे. प्रचलित विवाहपद्धतीचा नाश होऊन, '**प्रेमस्वातंत्र्य**' हीच प्रथा समाज—विकासासाठीं अमलांत आणली जाणें जरूर आहे. ज्यावेळीं अशी प्रथा अमलांत येईल त्याच वेळीं खऱ्या, स्व—इच्छेनें स्वीकारलेल्या उच्च—उदात्त प्रेमाचा अन् पातिव्रत्याचा जन्म झालेला आपणांस पाहावयास मिळेल. आज दिसणारें पातिव्रत्य हें खरें पातिव्रत्य नसून पुरुषांच्या विषयवासनेची प्रतिष्ठित गुलामगिरी आहे. ही प्रतिष्ठित गुलामगिरी

नाहींशी झाली पाहिजे. सारा समाज–स्त्री समाजसुद्धां–मुक्तप्रेमाचा उपासक बनला पाहिजे. प्रेमस्वातंत्र्य व प्रणयस्वातंत्र्य मिळालें पाहिजे. प्रणयस्वातंत्र्य हवें, पण त्यांत संयमाचा अभाव आणि स्वैराचाराची दुर्दमता नको, तर लेनिनच्या सांगण्याप्रमाणें 'प्रणय-स्वातंत्र्यांत अट्टाहासी संयमही नको, आणि विषयलोलुप स्वैराचारही नको'–अशा तऱ्हेचें तें हवें ! या स्वातंत्र्यांतून निर्माण होणाऱ्या संततीची जोपासना सरकारनें केली पाहिजे म्हणजे स्त्रीला समाज-हिताकडे लक्ष देण्यास व आपल्या ठायींचें कर्तृत्वकौशल्य प्रदर्शिण्यास अधिक सुलभ जाईल.

आई, तुला हें माझं म्हणणं समजणारसुद्धां नाहीं. मी आपलं उगाच भ्रमांत भरकटलं आहे हें. तुला जेवढं समजेल तेवढं समजो. न समजेल त्याचा अर्थ सांगण्यास व तें नीट समजावून देण्यास मी तुझ्याकडे लौकरच येत आहे. वस्तुतः पाहातां, मी यापूर्वींच तुला भेटण्यास येणें जरूर होतें; पण ज्या नीच पुरुषाच्या पाशवी कृत्यामुळें तूं समाजांतून उठलीस त्या पुरुषाला या जगांतून कायमचा घालविल्याशिवाय तुझी भेट घेणार नाहीं अशी मी शपथ घेतली होती. त्या शपथेची पूर्तता झाली आहे. आज दुपारीं येतो तुझ्याकडे. हें पत्र वाच–संपूर्ण वाच. आणि लागलीच फाडून टाक. आज माझ्या आणि पर्यायानें तुझ्याही सुरक्षिततेच्या दृष्टीनें या पत्राचा कुणालाही सुगावा न लागेल अशीच व्यवस्था करणें अगत्याचें आहे. कळावें.

—तुझाच—
**अभागी पुत्र.**

* * * *

दुपारचे चार वाजले होते. एक तरूण जिना चढून माडीवर येत होता आणि एक तरुणी माडीवरून खालीं येत होती. फिकट पिवळया रंगाचें रेशमी तलम पातळ त्या तरुणीनें परिधान केलें होतें. अंगांत तलम जॉर्जेटचा अस्मानी रंगाचा ब्लाऊज होता. पातळाची किनार जरीच्या बारीक काड्यांनीं सुशोभित झाली होती. तोंडाला स्नो-पावडर लावून मूळच्या गौरवर्णांत जास्तच भर टाकण्याचा प्रयत्न केला होता. पातळावर सेंटचा शिडकाव केलेला होता. त्याचा सुगंध दरवळत होता. त्या तरुणाचा पोषाक मात्र त्या-मानानें फारच कमी दर्जाचा होता. तो बोडका होता. केस विंचरलेले नव्हते. अंगांत नेहरूशर्ट-खादीचें पांढरें शुभ्र धोतर आणि पायांत कोल्हापुरी वहाणा ! कपाळ भव्य, नेत्र पाणीदार, चेहरा करारी अन् उग्र, पण त्यांतही प्रेमळतेची छटा, अंगानें धिप्पाड अन् मजबूत बांध्याचा होता तो. तो वर येत असतांना जिन्यावरील मधल्याच पायरीवर त्या तरुणीच्या सन्निध आला. त्यानें तिच्याकडे क्षणभरच निरखून पाहिलें. नंतर तो तसाच कांहीं न बोलतां वर निघून गेला. हा नवीनच तरूण कोण असावा या उत्सुकतेनें ती बाहेर जायला निघालेली तरुणी परत वर आली. तो तरुण सरळ मधल्या दालनांत गेला. तेथल्या खुर्चीवर बसला.

त्या तरुणाचं नांव हिमांशु ! आणि तरुणीचं नांव रत्ना !

रत्ना आंत गेली. तिनें आपल्या आईला बाहेर आणलें.

अगदीं लहानपणापासून आईला दुरावलेला तो हिमांशु-आणि त्याच्यासमोर ती-आपल्या मुलाला टाकून अन्यायी समाजांत

जीवनकलहार्थ झगडायला सिद्ध झालेल्या मातेची-करुणरम्य पण भांबावलेली मूर्ति !

दीर्घकालांनीं झालेलें माता-पुत्राचें तें प्रीति-मीलन होतें.

* * * *

" आई, माझी तुझी ही भेट पहिली आहे तशीच ती शेवटचीही आहे. मावशीजवळ तुझा फोटो होता. तो मला पाहायला मिळाला. त्या फोटोंत तूं ज्या पुरुषाबरोबर उभी होतीस तो पुरुष आज हयात नाहीं. मीच त्याचा नाश केला. स्वहस्तानें नव्हे हें खरं, पण त्याला जगांतून घालविला हेंही खरं. तुझ्या आयुष्यावर जळजळीत निखारे ठेवणाऱ्या इसमाबद्दलची साद्यंत हकीकत मावशीनें मला सांगितली. पण तिला तुझा पत्ता ठाऊक नसल्यानें मला तुझ्या-विषयींही त्यावेळीं कांहीं कळलें नाहीं. गेल्या वर्षी मुंबईत मी कांहीं दिवस मुक्काम ठोकला होता. त्यावेळीं सुंदरजी नांवाच्या एका गिरणी-मालकाच्या बंगल्यावर जाण्याचा नेहमीं योग येत असे. त्यांच्या मुलीजवळ तुझा फोटो पाहिला अन् त्याच वेळीं मी तिला त्याबद्दल खुलासा विचारला, पण आई, तिच्या तोंडून चमत्कारिक उद्गार बाहेर पडले. तुझा पत्ता मला तिच्याकडून मिळाला, त्याच वेळीं तुला भेटायला यावं असं मला वाटलं होतं, पण माझी प्रतिज्ञा पूर्ण होईपर्यंत तुला भेटायचं नाहीं असा माझा निर्धार होता. आज तुझ्या भेटीला आलों आहे पण तें अशा चमत्कारिक स्थितींत, कीं ही आपली पहिली-वहिली भेट शेवटचीच ठरावी !

आई, मी खुनी आहे. ज्या पुरुषानें तुला माणुसकींतून उठविलें त्याचा नाश मी स्वतः केला नाहीं हें खरं, पण दुसऱ्या एका व्यक्तीचा खून जाणून बुजून मी केला आहे. हे दोन्ही खून एकाच दिवशीं, एकाच रात्रीं झाले आहेत. तसं करण्यांत आम्ही खुनी इसम सापडूं नयेत असा आमचा डाव होता. रावबहादुर परगांवीं जाणार आहेत हें मला नक्की कळलें तेव्हांच मी माझ्या विश्वासांतल्या एका मित्राला बोलावून घेतलें. ते ज्या गाडीनें जाणार त्याच गाडीचें सेकंडक्लासचें तिकिट गांवांतल्या तिकिटविक्रीच्या दुकानावर मी आधींच खरेदी करून ठेवलें. तें मित्राजवळ दिलें. गाडींत बसतांना तिसऱ्या वर्गाचें तिकिट खरेदी करून तिसऱ्या वर्गाच्या डब्यांतच त्याला बसविलें आणि मी परत आलों.

शाळेंत इंग्रजी सहावींत असल्यापासूनच देशप्रेमाकडे माझा कल झुकूं लागला होता.त्यानंतर मॅट्रिकमध्यें गेलों.नाताळच्या सुट्टींत मंद्रूपला शेतकी प्रदर्शन पाहाण्यासाठीं व तेथें स्काऊटचें काम करण्यासाठींही गेलों होतों त्यावेळीं माझ्याबरोबरच अनेक सहाध्यायी होते, त्यांपैकींच एकानें आगगाडींत रावबहादुरांचा खून करून माझ्या प्रतिज्ञेची पूर्तता केली. मंद्रूपला त्या दिवशीं सोलापुरचे डॉ. अंत्रोळीकर यांचें जतकर वकिलांच्या अध्यक्षतेखालीं व्याख्यान झालें होतें. दोघांचींही भाषणें मी लक्षपूर्वक ऐकलीं. मला स्फूर्ति आली. त्यांच्या भाषणानें नवी चेतना निर्माण झाली. अन् त्याच वेळीं 'आपणही देशासाठीं कांहीं-तरी करायचंच' असा मी निश्चय केला.पुढें मला 'कामा गाटा मारू' व 'ग्रोधा' या पंजाबी टोळींची हकीकत वाचायला मिळाली,

'क्रांतिकारकांचा इतिहास' वाचायला मिळाला आणि बॅ. सावरकरांचें 'माझी जन्मठेप' हें पुस्तकही वाचायला मिळालें. हीं आणि अशींच अनेक पुस्तकं मला वाचायला मिळालीं आणि त्याचा परिणाम 'ब्रिटिश जुलमी सत्तेला दहशतवादाच्या जोरावर जितकें छळतां येईल तितकें छळायचें' अशा निश्चयांत झाला.

मॅट्रिकनंतर कलकत्ता कॉंग्रेस परिषदेला जाण्याची संधी मला मिळाली. मी गेलों, पण प्रत्यक्ष परिषदेला मला हजर राहतां आलं नाहीं. ती परिषद सरकारनें बेकायदेशीर ठरविली होती. परिषदेसाठीं जाणाऱ्यांना मध्येंच पकडीत व मारहाण करून परत पिटाळीत ! कलकत्ता उपनगराच्या स्टेशनवर मला पकडलें, तीन दिवस अटकेंत ठेवलें व नंतर सोडून दिलें. तिथून मी ठाण्याला आलों. त्यावेळीं तळयाचे पाळीवर, महात्मा गांधींनीं अस्पृश्यासाठीं एकवीस दिवसांचा उपवास जाहीर केला होता, तेव्हां त्यांना 'दीर्घायुरारोग्य लाभो' या विषयावर तेथील पुढारी काळदाते—कोतवाल, पालयेशास्त्री यांच्यासमवेत व्याख्यान दिलें.

पुढें तसल्या पुळचट हालचालींत मला कांहीं गम्य वाटेना. मी नंतर त्या सर्वांचा त्याग करून पुन्हां कलकत्त्याला गेलों. एका गिरणींत नोकरी धरली. नोकरीवर असतांनाच एका तरूण धाडसी मित्राचा परिचय वाढला. त्याच्याबरोबर राहून शस्त्रें वापरायचीं कशीं याचं शिक्षण घेतलं. तिथं असतांना अनेक प्रसिद्ध पुढाऱ्यांचीं ज्वलत् जहाल भाषणेंही ऐकायला मिळालीं. प्रत्यक्ष मालक-मजुरांतील व्देषजनक अन्यायी व्यवहार पाहायला मिळाले आणि एके दिवशीं कंटाळून

वैतागून मी तेथून पाय काढला. पण काढण्यापूर्वी त्यावेळीं मी एक अत्यंत जहाल असं समाज–सत्तावादावर भाषण केलं. मला त्यावेळीं पकडलं. अटकेंत ठेवलं. पंधरा दिवसांनंतर समज देऊन सोडून दिलं.

तेव्हांपासून सरकार माझ्या हालचालीवर पाळत ठेवूं लागलं. मलाही त्याची जाणीव झाली. मी प्रणयपुरांत येऊन खासगी शाळा उघडली. स्वतःच्या हिंमतीवर एकटाच शाळा चालवूं लागलों.

तेथल्या असिस्टंट कलेक्टरांचीं अनन्वित कृत्यें कळलीं. सत्तेच्या जोरावर विलासाची तृप्तता करण्यासाठीं ते सत्तेचा दुरुपयोग करून कसा धिंगाणा घालीत हें मला नित्य पाहायला मिळे. अखेरीस त्यांचा पुरा बींमोड करायचा म्हणजे त्यांना यमसदनालाच पाठवायचें असें मी ठरविलें व संधीची वाट पाहात बसलों.

सरकारची पाळत माझ्या हालचालीवर होतीच. तेव्हां सरकारला सुगावा लागूं नये आणि कार्य तर यशस्वी व्हावें एवढ्यासाठीं मी माझ्या मित्राला बोलावून घेतलं. आणि लागलीच रात्रीच्या गाडीनें पिटाळलंही. त्याला त्यावेळीं मी माझ्याजवळचा–मुठीवर माझें नांव कोरलेला–मोठा सुरा दिला. त्या सुऱ्याच्या सहाय्यानें त्यानें रावबहादुरांचा खून केला. दौंड स्टेशनवर उतरून लागलीच गाडी बदलून तो पुण्याला त्यावेळीं निसटलाही. माझ्या नांवाचा सुरा त्याचे हातीं देण्याचा माझा हेतु तो संकटांत सांपडला जाऊं नये, त्याच्यावर संकट येऊं नये असा होता. आणि बऱ्याच प्रमाणांत तो साध्यही झाला. शिवाय त्या दिवशीं मी परगांवला गेलोंच नाहीं हें मला पुराव्यानें सिद्ध करून दाखवितां येणें शक्य असल्यानें मलाही कोणी पकडूं नये असा माझा दुसरा हेतु होता.

मित्राला स्टेशनवर पोहोंचवून, ‘ कुठल्या स्टेशनवर रावबहादुरांच्या डब्यांत चढायचें, त्यांच्याशीं प्रथम सलगीनें बोलायचें, त्यांना संशय येऊं नये म्हणून जवळचें सेकंडक्लासचें तिकिट दाखवायचें व गाडी चालूं झाल्यानंतर अचानक आणि अत्यल्पावकाशांत काम उरकून पुढल्या स्टेशनवर उतरून पुन्हां तिसऱ्या क्लासच्या डब्यांत येऊन बसायचें. बसतांना सेकंडक्लासच्या तिकिटाचा सर्वस्वीं नाश करायचा’ वगैरे सर्व माहिती त्याला देऊन मी परत आलों. तों महाराजा चौकांत कोळेगांवकर भेटले. क्षणाचाही विचार न करतां तत्क्षणीं त्यांना यमसदनाला पाठवलें व जवळचें पिस्तूल तळयांत फेंकून देऊन निर्विघ्नपणें खोलींत येऊन बसलों. माझ्या खोलीची झडती झाली, पण त्यांत सरकारला आरोप सिन्द्ध करतां येईल असें कांहींच सांपडलें नाहीं. अद्यापपावेतों रिकामा आहे पण आतां केव्हां पकडतील याचा नेम नाहीं. असा माझा आत्तांपर्यंतच्या जीवनाचा इतिहास आहे. माझ्या जीवनांतील हा फक्त एक भाग आहे. या सारखाच चमत्कृतिपूर्ण व रहस्यमय असा दुसरा प्रेमाचा भाग आहे. ”

हिमांशु आपली हकीकत आपल्या आईला अगदीं एकांत ठिकाणीं सांगतो आहे. रात्रीचें बारा वाजून गेले होते. सर्वत्र सामसूम होती. मोहनजी मुंबईला गेले होते. त्या सबंध वाड्यांत रत्ना, हिमांशु, कमलाबेन– नव्हे, शकुंतलाबाई–आणि त्यांचा एक नोकर एवढींच माणसें होतीं; नोकर खालीं पडवींत झोंपला होता. रत्ना आपल्या खोलींत झोंपली होती आणि हे दोघे मात्र तिसऱ्या मजल्यावर आंत–आंतल्या खोलींत हलक्या आवाजांत बोलत होतीं.

* * *

आपल्या आयुष्यांतील प्रेमाचा आणखी एक निराळा भाग आहे असं हिमांशु म्हणाला आहे. तो त्याच्या प्रेमाचा भाग असाः—

हिमांशु मुंबईला होता. त्यावेळीं त्याला सुंदरजींच्या बंगल्यावर नेहमीं नेहमीं जावें लागत असे हें त्यानेंच आईला सांगितलें आहे.

सुंदरजींची मुलगी-हिराबेन-हिचें हिमांशूवर प्रेम बसलें. हिमांशूचेंही तिच्यावर प्रेम बसलें. प्रथम ती विवाहित आहे हें बरेंच दिवस हिमांशूला कळलें नाहीं. तिच्यासाठीं तो बंगल्यावर वरचेवर जात होता. एके दिवशीं हिराबेनजवळ त्यास आपल्या आईची तसबीर पहावयास मिळाली. त्यानें तिला हा फोटो तुझ्याजवळ कसा आला हें विचारलें. त्यावेळीं हिराबेननें 'या फोटोंतली ही बाई म्हणजे माझ्या संसाराचा सत्यनाश करणारी कुलटा आहे' असें सांगितलें. तें ऐकून त्याच्या मनावर जास्तच परिणाम झाला आणि त्या वेळींच त्याला हिराबेन विवाहित आहे हें कळलें.

एकदां तो बसमधून चालला होता. त्यावेळीं एक अंदाजे अठ्ठावीस वर्षें वयाची स्त्री घाईघाईनें बसमध्यें चढली. थोड्या वेळानें बस चालूं झाल्यावर कंडक्टर तिच्याजवळ आला. तिनें त्याच्या हातावर दहाची नोट ठेवली. पण योगायोग असा, कीं ती नोट बनावट निघाली म्हणून कंडक्टरनें परत दिली आणि तिच्याजवळ तर सुटे पैसे नव्हते. तिची त्यावेळची स्थिती पाहून जवळच बसलेल्या हिमांशूनें तिला पैसे दिले. तिला ज्या ठिकाणीं उतरायचं होतं त्याच ठिकाणाकडे हिमांशूही निघाला होता. बसमधून उतरल्यानंतर हिराबेननें अत्याग्रहानें त्याला आपल्या बंगल्यावर नेलें. त्यावेळीं

केवळ औपचारिकच बोलणें झालें. हिराबेन यावेळीं जरी अठ्ठावीस वर्षांची झाली होती, तरी ती अगदीं नवख्या तरुणीसारखी दिसत होती. कांहीं कांहीं स्त्रियांचें तारुण्य दीर्घकालही टिकून राहतें याची सत्यता तिच्याकडे पाहिलं म्हणजे पटते. साहजिकच हिमांशूला ही अठ्ठावीस वर्षांची असेल असं वाटलं नाहीं. त्याचा तर्क ती फार तर बावीस वर्षांचीच असावी असा होता. त्यानें तिला 'तुझे वय काय, लग्न झालें आहे काय ?' असले प्रश्न कधींच विचारले नाहींत. अनुनय कालांत कोणीही तरुण–तरुणी असले प्रश्न कधीं एकमेकांना विचारीत नसतातच. या पहिल्या भेटींतूनच त्यांचें प्रेम वाढत गेलें.

मध्यंतरी, प्रणयपूरचे माजी असिस्टंट कलेक्टर मुंबईस आले होते. त्यांचा आणि सुंदरजींचा बराचसा परिचय होता. या कोळेगांवकरांनीं एकदां हिराबेनला पाहिलं, तेव्हांपासून त्यांचें मनांत तिजविषयीं आसक्ति निर्माण झाली. हें हिमांशूला अप्रत्यक्षपणें कळलंही. त्यानें त्यांची दाद तिथें लागूं दिली नाहीं. आणि त्यांचा खून करण्यास प्रवृत्त झालेल्या हिमांशूच्या मनांत त्यांच्या याच कृत्याची अढी बसली असावी.

त्यानंतर जेव्हां त्याला आपल्या आईचा आणि हिचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष कांहीं संबंध आहे हें कळलं, तेव्हांपासून तो तिच्या घरीं जाईनासा झाला. आणि त्यानंतर तर त्यानें मुंबईच सोडली.

* * * *

पहांटे पांच साडेपांचची वेळ होती.

हिमांशू उठला. हिमांशूची आईही उठली. हिमांशू जायला निघाला होता. त्याची आई त्याला जाऊं नको असें सारखी विनवून सांगत होती. पण तिथं राहाणें अनिष्ट आहे हें तो जाणून असल्यानें त्यानें तिच्या विनवणीकडे दुर्लक्षच केलें.

तो दिवाणखान्याबाहेर जिन्याच्या पहिल्या पायरीजवळ आला. त्यानें सहज मागील बाजूच्या खिडकींतून खालीं रस्त्यावर पाहिलें. रस्त्यावर बंगल्याच्या फाटकाजवळ टांगा उभा होता. त्यांतून मोहनशेट उतरत होते. ते मोहनशेटच असावेत अशी हिमांशूला मुळींच कल्पना आली नाहीं. मोहनशेट मुंबईला गेले होते ते पहांटेच्या गाडीनें परत आले होते.

हिमांशु आणि शकुंतलाबाई दोघे जिना उतरून खालीं आलीं. त्याच वेळीं मोहनशेट वर येत होते. त्यांनीं हिमांशूला पाहिलं मात्र-तोंच त्याची मानगूट त्यांनीं दांतओंठ खात धरली आणि आवळली.

मोहनशेटजींना हिमांशूचा व हिराबेनचा प्रणयसंबंध आहे हें कळलें होतें, कोळेगांवकरांनीं त्यांना सांगितलें होतें. साहजिकच त्यांचा हिमांशूवर राग होता.

हिमांशु, कांहीं झालं तरी त्याच्यापेक्षां तरुण अन् धिप्पाड होता. त्यानें त्यांना एक गचांडी मारली अन् झटक्यानें धूम ठोकली.



## ११ गोंधळ

साडेदहा अकरा वाजण्याचा सुमार होता तो. वसंत अद्यापि गिरणींतून यायचा होता. निर्मला नुक्तीच स्नान करून बाहेर आली होती व नेसलेलेंच पातळ ती पुन्हां नीट व्यवस्थित नेसत होती. तितक्यांत खानावळीच्या पोऱ्यानें डबा आणून ठेवला व तो निघून गेला. मागून पोष्टमन आला. त्यानें निर्मलेच्या नांवाचें एक पाकीट टाकलें.

वसंत सकाळीं नऊ–साडे नऊच्या सुमारास जाई. गेल्यानंतर प्रथम तो साऱ्या गिरणींतून एकदां, फार तर अर्धा तास तरी फिरून येई. नंतर कांहीं कागद तपासणं, हजेरीबुक पाहाणं, किरकोळ हिशेब पाहाणं–मालाच्या आवक जावक पुस्तकाची तपासणी

करणं असलीं किरकोळ कामं तो करी व साडेअकरा वाजतां तो गिरणींतून बाहेर पडे.

गिरणींतल्या साऱ्या खात्यांतून फिरून तो नुक्ताच आपल्या टेबलाशीं येऊन बसला होता. हजेरी मास्तरानें, मजुरांच्या आलेल्या पासावरून हजेरी मांडून तें हजेरीबुक वसंताच्या टेबलावर आणून ठेवलें होतें. त्यानें उघडून त्यावरून नजर फिरविली.

दारावरचा पट्टेवाला आंत आला. त्यानें वसंतापुढें एक चिठ्ठी आणून ठेवली. वसंतानें प्रथम हजेरीबुकावरील त्या पानावरून पाहाणी केली. आणि नंतर त्यानें ती चिठ्ठी उघडून वाचली. त्यानें एका लहानशा कागदावर आपल्या खोलीचा ( खोली सापडायला सुलभ जाईल इतका सविस्तर ) पत्ता लिहिला व पट्टेवाल्याच्या हातीं तो कागद देऊन 'त्यांना खोलीवर जायला सांग' असें सांगितलें.

* * *

निर्मलेला आलेलं पत्र तिच्या वडिलांचं होतं. त्यांत त्यांनीं निर्मलेला, तिच्या वर्तणुकीबद्दल लिहिलं होतं.

"... माझा तुझ्यावर पूर्ण विश्वास आहे. शिवाय माझ्या दृष्टीनें नियोजित असा योग्य वर वसंतच आहे. त्याच्या सान्निध्यांत तूं आज असलीस तर त्यांत खरोखरीच मला गैर वाटत नाहीं, तो आज लग्नाला तयार नसला तरी आजच्या तुझ्या निकटच्या सान्निध्यांत तुमच्या प्रेमाला बळकटी येईल, व त्यायोगें त्याच्या मनावर इष्ट तो परिणाम होऊन तो लग्नाला तयारही होईल हें खरं, पण हें सारं मला पटत असलं, तरी

जगाला पटणं शक्य नाहीं. थोड्याबहुत प्रमाणांत आम्ही म्हातारे सुद्धां पुरोगामी मताचे असतों, पण आमच्यांतला दुबळेपणा हा, कीं आम्हांला आमच्या पुरोगामी मतांची अम्मलबजावणी करण्याचें धाडस होत नाहीं. हा दोष आम्हां म्हाताऱ्यांतच आहे असं कांहीं नव्हे, तुम्हां तरुण माणसांतून असलेलाही दिसून येतो. कित्येक तरुण माणसं पुरोगामी मताचे असतात, पण केवळ जननिंदेला भिऊन ते आपलीं मतं बाजूला ठेवून मुकाट्यानें प्रतिगामी मतां-प्रमाणं चालतात. माझ्या एका स्नेह्यानं काल मला एक हकीकत सांगितली. 'गणेशोत्सवांत हरिजागर करणं हा एक आवश्यक कार्यक्रम म्हणून ठरवून ठेवलेला असतो. सार्वजनिक गणेशोत्सवाच्या ठिकाणीं कांहीं तरुण मंडळींना हरिजागर करून विनाकारण खर्च करणं पसंत पडेना. हरिजागराचे मंत्र म्हणणाऱ्या भटांना त्या मंत्राचे अर्थसुद्धां कळत नाहींत. शिवाय त्या कार्यक्रमांत इतकं महत्त्व नाहीं असं तरुण मंडळींना वाटलं व त्या कार्यक्रमाला त्यांनीं अजिबात फांटा द्यायचा असं ठरविलं. त्यांनीं आपली कल्पना वर्गणीदारांपुढें मांडली. त्यांत बरेचसे सनातनी होते. त्यांना तें पसंत पडलें नाहीं. आणि अखेर त्यांच्या दुराग्रहाला तीं तरुण माणसं नाइलाजानं बळी पडलीं.' ही त्यानें सांगितलेली हकीकत. यांत तरुणांना कांहीं वेळ लढा तरी करावा लागला. पण कांहींही न होतां, न पटणाऱ्या मतांचं मुलगा मुकाट्यानं कसा अवलंब करीत असतो याचं उत्कृष्ट उदाहरण काल मला प्रत्यक्षच पाहायला मिळालं. सायंकाळीं मी येत होतों. नुक्तीच शाळा सुटली होती. रस्त्यावर मुलें आपापसांत कांहीं बोलत होतीं. पैकीं

दोघां मुलांचा संवाद मला ऐकायला मिळाला. एक म्हणत होता— " अरे, हें गळ्यांतलं जानवं ! कधीं चुकूनसुद्धां मी संध्या करीत नाहीं. बरं, या जानव्याचं खरं महत्त्व असं आज पूर्वीइतकं खरोखर उरलं नाहीं; किंवा तें आम्हांला नीटसं कळलं नाहीं असं म्हण हवं तर; पण तें जोंपर्यंत कळलं नाहीं अन् कळत नाहीं तोंपर्यंत हें जानवं गळ्यांतच ठेवूं नये असं वाटतं. पण म्हणून तें काढून फेंकून देण्याचं धैर्य होत नाहीं. आई काय म्हणेल, बाबा काय म्हणतील, शेजारपाजारचे लोक काय म्हणतील याची भिति वाटते. " हीं दोन्हीं उदाहरणं आज या पत्रांतून देण्याचं कारण असं, कीं जिथं या नव्या रक्ताच्या तरुणांची ही स्थिति, तिथं आमच्यासारख्या ना पुरोगामी ना प्रतिगामी—अशा, दोहींच्या सीमारेषेवर पाऊल ठेवणाऱ्या म्हाताऱ्यांची काय स्थिति होत असेल ?

तेव्हां, आज मला तुझं तेथील वसंताजवळील राहणं पसंत असलं, तरी जगाच्या भीतीनें मला तसं उघडपणें कृतींत आणायला धैर्य होत नाहीं. तूं शुद्ध पवित्रच आहेस व राहशीलही अशी माझी पूर्ण खात्री असली, तरी पापी डोळ्याचं सैतानी जग तुम्हां दोघांच्या आजच्या वर्तणुकीवर सातच नव्हें तर, तर छप्पन मजली इमारत उठवायला केव्हांही कचरणार नाहीं ही गोष्ट आपण ध्यानीं आणली पाहिजे.

एवढ्यावरून तुला माझा आशय कळला असेलच. तेव्हां आतां यापेक्षां तिथं तूं जास्त दिवस राहूं नयेस हेंच जास्त उत्तम ! लवकरच निघून ये. कळावे.

तुझाच

**बाबा**—

ता. क.:–पापी डोळयाच्या सैतानी जगाबद्दल मी या पत्रांत थोडसं लिहिलं आहे ना, त्याचं प्रत्यंतर आजच मला पाहायला मिळालं. येथलं स्थानिक वृत्तपत्र 'साप्ताहिक गुंडा' दर सोमवारीं सायंकाळीं प्रसिद्ध होतं हें तुला माहीतच आहे. आजच्या या 'गोफणीं'तून सुटलेल्या 'गुंड्या'च्या अंकांत तुझ्याबद्दलचा घाणेरडा मजकूर प्रसिद्ध झाला आहे. त्या अंकाची प्रत मुद्दाम तुझ्याकडे सोबत बुकपोष्टानें पाठवीत आहे. जरूर वाच."

* * * *

निर्मलेनें पत्र बाजूला ठेवलं. व वडिलांकडून आलेल्या 'साप्ताहिक गुंडा'ची प्रत तिनें उघडली. त्यांत पुढील मजकूर तिला वाचायला मिळाला.

**" सुविद्य सुशिक्षित सुस्वरूप तरूणीचें पलायन !**
**अनैतिक संबंधाची कुजबूज ! !**

येथील एका चांगल्या घराण्यांतील एक सुशिक्षित सुविद्य तरूण कुमारिका घरांतून पळून गेली असून सध्यां ती मुंबईला आहे असें समजतें. घरांतून पळून जायला कारण काय झालें असावें हें कळत नाहीं, तरी परंतु वाढते वय, वाढत्या वयामुळें प्राप्त झालेली स्वतःच्या स्त्रीत्वाची जाणीव आणि भावनांची प्रकर्षता या त्रयींमुळें ही कुमारिका कोण्यातरी तरुणाबरोबर पळून गेली असावी—अगर खराब होऊं पाहाणाऱ्या अब्रूला दडविण्यासाठीं तरी गेली असावी असा अंदाज केल्यास तो चुकीचा होऊं शकणार नाहीं असें आम्हांस वाटतें. तिचे बंधू तिला शोधायला गेले आहेत, असेंही समजतें."

* * *

ही बातमी वाचून निर्मलेला चेव आला. काँग्रेससारख्या प्रतिष्ठित संस्थेच्या पुरस्कारार्थ अन् प्रचारार्थ निघालेल्या पत्रानें असल्या घाणेरड्या स्वरूपाच्या आणि त्याही सर्वस्वीं खोट्या असलेल्या बातम्या छापाव्यात याचें तिला भारी वैषम्य वाटलें. ती स्वतः खरोखरीच पळून आली नव्हती. वसंताला मार लागला हें कळलें म्हणून ती इथं आली होती. येतांना तिनें विभाकराला आणि आपल्या आईला सांगितलेंही होतें. वडिलांना विचारून निघण्यांत तिला कमीपणा वाटत नव्हता अगर ती त्यांना भीत नव्हती. पण ते त्यावेळीं घरीं नव्हतेच. तरी परंतु मुंबईला आल्यानंतर जेव्हां तिला स्वस्थता लाभली, त्याच वेळीं तिनें वडिलांना पत्र लिहून सारें—कांहीं खुलेपणानें कळविलें होतेंच. त्या पत्रांत जशी ही बातमी प्रसिद्ध झाली होती, तशीच सुहासबद्दलही प्रसिद्ध झाली होती.

ती तें पत्र वाचीत होती, इतक्यांत एक तरुण इसम खोलींत आला व 'वसंतराव वेलीणे यांची खोली हीच ना ?' असें विचारूं लागला.

वस्तुतः ती खोली नव्हती. तो साधारण प्रतीचा लहानसाच पण टुमदार दिवाणखाना होता असं म्हणायला कांहीं प्रत्यवाय नाहीं. पलीकडे आंत जोडूनच लहानशीच खोली होती. पण मुंबईत एकटा इसम कितीही मोठ्या ऐसपैस जागेंत राहो, त्या जागेला 'खोली' म्हणण्याचीच बहुशः प्रथा पडलेली आहे.

तो विचारणारा इसम हिमांशु होता. गिरणींतून आला होता.

निर्मलेनें त्याला बसायला खुर्ची दिली व 'आपण कोण ? काय ? कशासाठीं आलांत ? काय काम आहे ?' असें विचारलें.

पण हिमांशूनें तिच्या एकाही प्रश्नाला उत्तर दिलें नाहीं.

* * *

सुहास परत येत नाहीं असं कळलं, तरी विभाकर अद्यापि परत गेला नव्हता. त्याचा एक बडा श्रीमंत, पण रंगेल गृहस्थ स्नेही होता. हा श्रीमंत मनुष्य त्याच्यापेक्षां वयानें पुष्कळच मोठा होता. हे दोघेही एकाच गांवांतले रहाणारे, पण त्यांच्या भेटी कधींच एक-मेकांच्या घरीं होत नसत—झाल्याही नव्हत्या. बहुधा विलासी, रंगेल अन् विशेषतः बाहेरख्याली माणसांचे स्नेही पुष्कळ असले, तरी त्यांच्या भेटी कधीं घरीं होत नसतात. घराबाहेर त्यांचे अड्डे ठरलेले असतात. त्या ठिकाणींच त्यांच्या भेटी—चर्चा—ठराव—( सभेंतले नव्हे, ) होत असत. अशाचपैकीं विभाकराचा व त्या श्रीमंताचा स्नेह होता.

हा श्रीमंतही मुंबईला सध्यां आणखी कांहीं कामासाठीं येऊन राहिला होता. त्याकडेच विभाकरही राहिला होता.

विभाकराला काय लहर आली कोण जाणें; त्यानें आज त्या श्रीमंताला घेऊन वसंताच्या भेटीला जायचें ठरवलें व आपला हा बेत त्याला सांगून त्याची सम्मतिही मिळवली.

विभाकर आणि तो श्रीमंत इसम दोघेही वसंताचे खोलीवर आले.

* * * *

गिरणीचा भावी असिस्टंट मॅनेजर आणि नवाच मनुष्य म्हणून कधीं कधीं गिरणी मालक—सुंदरजी—त्याला बंगल्यावर बोलावून घेत व लहर लागेल त्याप्रमाणें त्याच्याशीं निरनिराळया विषयांवर चर्चाही करीत. वसंतही खुलेपणानें त्यांच्याशीं विचारविनिमय करी. त्यांच्या घरीं जाण्यानें त्यांची मुलगी हिराबेन हिच्याशीं त्याची ओळख झाली होती. हिराबेन सुद्धां कधीं कधीं त्यांच्या चर्चेत भाग घेई. हिराबेनच्या मनांत वसंताविषयीं आदर—आस्था वाटे. ( प्रेम नव्हे. ) एकदां तिनें वसंताला 'मी तुमच्या खोलीवर एकदां येणार आहें' असें बोलून दाखवलें होतें व त्याच्याजवळून खोलीचा पत्ताही लिहून घेतला होता.

हिराबेनला आज वसंताच्या खोलीवर जावेसें वाटलें. यापूर्वी एकदां ती येऊन गेली होती खोलीवर. वसंत गिरणींतून साडे-अकराला खोलीवर जाण्यासाठीं बाहेर पडतो हें हिराबेनला माहीत झालें होतें. तिनें घड्याळांत पाहिलें. बरोबर सव्वाअकरा वाजतां ती बंगल्यावरून वसंताच्या खोलीवर येण्यासाठीं मोटारींतून निघाली.

* * *

सुहास मुंबईत एका फिल्म कंपनींत नटी म्हणून राहिली. तिथल्या एका नटीची आणि तिची ओळख झाली. पुढें परिचय वाढला. कुठलाही मनुष्य कोठल्या दर्जाचा असेल, त्याची लायकी काय असेल हें प्रथम कळणें दुरापास्तच असतें बहुधा. तीच सुहासची व त्या नटीची अवस्था होती. दोघींनाहीं एकमेकींची लायकी व एकमेकींचा दर्जा कळून आला नव्हता. त्या नटीनें

मात्र अंदाजानें आणि तर्कानें सुहास कोणत्या मनःप्रवृत्तीची असेल हें ताडलें होतें. सुहासला मात्र तिजबद्दल कांहींच कळलें नव्हतें. घराच्या चार भिंताडांतून बाहेर पडलेली अननुभवी सुहास अद्यापि चेहऱ्यावरून कुंडली जाणण्याइतकी हुषार झाली नव्हती.

आज सकाळपासून, नव्हे; काल रात्रीपासूनच तिला विभाकराची फार आठवण झाली होती. विभाकर मुंबईत आहे हें तिला माहीत होतं. पण त्याचा नक्की पत्ता तिला माहीत नव्हता. तो कसेंही करून निर्मलेकडून घ्यायचाच असा निश्चय तिनें केला होता. ती विभाकराच्या भेटीसाठीं अत्यंत अधीर झाली होती. विभाकराची तिला आठवण व्हावी आणि त्याच्या भेटीची तिला उत्कंठा वाटावी याचें कारणही तसेंच जबर अन् चमत्कारिक स्वरूपाचें होतें.

तिची ही नवी मैत्रीण नटी—मिस् शीलोत्तमा काल तिच्या घरीं आली होती. ही मिस् शीलोत्तमा रूपानें फार उत्तमपैकीं नव्हती. ती कंपनींत किरकोळ किरकोळ कामें करणारीच एक सामान्य नटी होती. तिच्याविषयीं कंपनींतल्या इतर मंडळींचें विशेषसें चांगलें मत नव्हतें. पण सुहासच्या मनावर मात्र तिनें आपल्या गोड गोड पाल्हाळिक भाषणानें विलक्षण पगडा बसविला होता. सायंकाळीं सहा वाजण्याच्या सुमारास शीलोत्तमा सुहासकडे आली. आणि सुहासला घेऊन ती लागलीच बाहेर निघालीही. शीलोत्तमेच्या सांगण्यावरून कुठेंतरी चांगल्या बड्या ठिकाणीं आपल्याला जायचें आहे अशी सुहासची समजूत झाली होती. आणि म्हणून तिनें बाहेर निघण्यापूर्वीं थाटमाटही बराच केला.

शीलोत्तमेनें सुहासला ज्या ठिकाणीं आणलें तें ठिकाण बडें होतें काय ?

होय ! होतें खरें बडें (!) ठिकाण ! ! !

पण तें फारच निराळ्या अर्थानें.

शीलोत्तमेनें सुहासला भर रस्त्यावर असलेल्या एका सुप्रसिद्ध मसाज हॉलमध्यें आणलें होतें.

आपण मसाज हॉलमध्यें कां जात आहोंत हें प्रथम सुहासला कळलेंच नाहीं; पण प्रत्यक्ष हॉलमध्यें पाऊल ठेवल्यानंतर तिच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला.

सुहासला पाहिल्याबरोबर तिथली ती स्थूल अन् काळीसावळी बाई आपल्या नाकाचा शेंडा फणफणवीत शीलोत्तमेला उद्देशून म्हणाली—"ही कोण ? तुझ्या कंपनींत आलेलं नवं पाखरूं वाटतं ? बरंच गिर्रेबाज दिसतंय् ! हरकत नाहीं. येत जाईल ना आधींमधीं इथं ती. हो, सारी सोय केली जातेच इथं. तुला माहीतच आहे कीं !"

अनैतिक कृत्य ! मग तें कसलंही आणि कोणतंही असो ! घराच्या चार भिंती आंत करणं निराळं आणि जगाच्या चव्हाट्यावर करणं निराळं. त्यांत तफावत ही असायचीच आणि त्याचा परिणामही मनावर व्हायचाच !

पाण्यांत राहून माशाशीं वैर करणं बरं नव्हे. आणि आतां तर सुहास अशा ठिकाणीं आली होती, कीं त्याबद्दल वावगें अवाक्षरही बोलणें घातक—अती—घातक झालें असतें तिला.

'मसाज हॉल' या भबक नांवाखालीं त्या ठिकाणीं काय काय कृत्यें चालतात याची पुरी जाणीव सुहासला झाली. शीलोत्तमेनें दिलेला तो पहिला धडा सुहासनें नाइलाजानें आणि नाखुषीनें कां होईना, पण गिरवला.

तिथं असतांनाच, त्यावेळीं तिला विभाकराची आठवण झाली होती. तिथून परत आली तरी तिची आठवण नाहींशी झाली नव्हती. आतां तर ती इतक्या पराकोटीला पोहोंचली, कीं प्रत्यक्षच त्याची भेट घ्यावीसें तिला वाटूं लागलें. तिला त्याचा पत्ता माहीत नव्हता, तो मिळवावा या हेतूनें सकाळींच सुहास निर्मलेकडे येण्यास निघाली !

* * * *

निर्मला आणि हिमांशु बसले होते. वसंताची परत येण्याची वेळ झाली होती. त्याचीच वाट पहात ते बसले होते.

तितक्यांत हिराबेन मोटारींतून उतरून वर आली व तिनें खोलींत पाय ठेवला. तिनें हिमांशूला पाहिलें मात्र—तत्क्षणींच "हिमांशु—हिमांशु—तुम्ही—इकडं कुठं ?" असें अडखळत अडखळत साश्चर्यभरित उद्गार काढले.

तिच्या आश्चर्याचा हा भर ओसरतो आहे न ओसरतो आहे तोंच सुहास आली.

तिच्या मागून—थोड्याच मिनिटांत—विभाकर अन् तो त्याचा श्रीमंत स्नेही हे दोघेही आंत आले.

विभाकराचा स्नेही श्रीमंत मनुष्य कोण असावा असं वाटतं ?

तो इसम म्हणजे रत्नाचे वडील–हिराबेनचे पतिराज–मोहन-शेट होय !

हिमांशु; त्याच्यावर अनुरक्त असलेली हिराबेन; हिराबेनचे पतिराज मोहनशेट; इकडे विभाकर; निर्मलेच्या शेजारीं सुहास आणि जिना चढून खोलीकडे येत असलेला वसंत !

अशा वेळीं तिथं काय गोंधळ माजला असेल असं वाटतं ?

कल्पनाच केलेली बरी.



# १२ प्रेम

" **प्रफुल्लचूताङ्कुरतीक्ष्ण सायको**
**द्विरेफमालाविलसद्धनुर्गुण:**
**मनांसि भेत्तुं सुरतप्रसंगिनां**
**वसंतयोद्धा समुपागतः प्रिये ॥** "

मधु ! नाजुक, गौरवर्ण, मनोद्य स्त्रीच्या अंगावरील पांढरेशुभ्र–धवल-विरल वस्त्र कसें शोभायमान अन् विलोभनीय दिसतें, तशी–मधु-मासांतील पौर्णिमेच्या रात्रीं निसर्गराज्ञीही पौर्णिमेच्या सुषमेंत न्हाऊन निघाल्यानें जास्तच सुंदर अन् विलोभनीय दिसते. मन्मथाची सारी करामत या मधुमासांतच सुरूं होते. तो पुष्पधन्वा–अरविंद, अशोक, आम्र, नवमल्लिका आणि नीलोत्पल्ल या पांचही पुष्पगुच्छांनीं विणलेल्या धनुष्याला, अलिकुलांची प्रत्यंचा ताणून प्रणयी युवतींच्या अंतःसागरांतील वीचि उसळविण्यास–सज्ज होतो. " **ऋतूनां कुसुमाकरः** " कुसुमाकर–कुसुम आकर–वसंतऋतु ! यांत सृष्टीची

चारुता उताला येते. वायूंत मंदता, शीतलता आणि सौगंधता एकवटते. वृक्षांना नवी पालवी फुटते, फुलं हंसूं लागतात, भुंगे गाऊं लागतात, नवयौवना सृष्टिसुंदरी नाचूं बागडूं लागते; सर्वच कसें सुंदर मनोहारी असतें ! '**सर्वं प्रिये चारुतरं वसंते.**'

> "**मधुश्च ते मन्मथ साहचर्या—**
> **दसावनुक्तेऽपि सहाय एव**
> **समीरणो नादयिता भवेति**
> **व्यादिश्यते केन हुताशनस्य ॥**"

कविकुलगुरु कालिदासाचें काव्यच मुळीं मनोज्ञ—चटका लावणारें व वस्तुस्थिति निदर्शक ! ज्या ठिकाणीं मन्मथ—कामदेव—त्या ठिकाणीं मधु हा असायचाच ! वसंतऋतूंतच कामदेवाच्या लीलांना बहर येतो. अग्नि प्रज्वलित झाला म्हणजे त्या ठिकाणीं वायु नसेल असं कधीं झालं आहे का ? तसंच आहे हें, असं कालिदास सांगतो आहे, आणि तें सत्य आहे. मन्मथ आहे तेथें मधु हा असायचाच ! शिशिराची शैत्यता आणि ग्रीष्माची उष्णता या दोहींचें माध्यम वसंतांत असतें ! मधुच तो ! पारिजातक, मोगरा, जाई, जुई, निशिगंध, रातराणी, चाफा, कण्हेरी, पळस, कमळ साऱ्याच फुलराण्या कशा हंसायला लागतात ! जिथं सृष्टी-सुंदरीची ही मनोज्ञ चारुतरावस्था तिथं मानव—सुंदरींची काय अवस्था असेल ?

सर्व जगाला आग लावणारा हा अनंग मधुमासांत तर तन्वांगींच्या अंगाला जास्त आग लावतो. '**वसंते द्विगुणः कामः**'—काम

द्विगुणित होतो. तरुणींच्या अंतःकासारांत प्रणयाच्या वीचि नुसत्या खळखळत असतात. तें रेशमी चित्रविचित्र रंगाचं विरल कुसुंभारुण तलम पातळ, काळेभोर कुरळे केस, भव्य कपाळ, चंचल नाचरे नेत्र, गौर गुलाबी गाल, मुष्टिमेय मध्यकटिप्रांत, कठिण–पुष्ट–टचटचीत उरोभाग—

“ **नेत्रेषु लोलः मदिरालसेषु**
**गंडेषु पाण्डुः कठिनः स्तनेषु**
**मध्येषु निम्नो जघनेषु पीनः**
**स्त्रीणामनंगो बहुधा स्थितोऽद्य ॥** ”

श्यामांच्या भ्रूकटाक्षांत, मधुवचांत, अलसागमनांत, शैथिल्यांत, बोलण्यांत, चालण्यांत, हंसण्यांत, बसण्यांत, उठण्यांत, पडण्यांत, मौनांत—साऱ्यांतच चारुता भरलेली असते. कालिदासानें याचं कितीतरी उत्तम वर्णन केलं आहे. मी पामरानें आणखी अधिक तें काय करायचं ? पण मोह आवरत नाहीं; म्हणून त्याच्याच आधारानें हें एवढं **सहेतुकपणें** लिहिलं आहे.

वसंतऋतूंतील पौर्णिमेची रात्र होती. साधारण अकरा वाजून गेले असतील–अगर वाजले असतील. चहूंकडे पांढरं शुभ्र चांदणं पसरलं होतं. सागराला भरति आली होती. त्याच्या वीचि क्षणाक्षणाला उसळत होत्या. रतिक्रियेच्या पूर्वी दुग्ध प्राशन करीत असतांना गंधर्व–अप्सरांनीं, जणुं दुग्धाच्या गुळण्या टाकल्या असाव्यात त्याप्रमाणें त्यावेळीं त्या धवल चांदण्यांत सागराच्या सळसळणाऱ्या वीचि दिसत होत्या.

वसंत आणि निर्मला गच्चीवर बसलीं हीतीं. दोघांच्याही चेहऱ्यांत किंचित् म्लानता सामावली होती. निर्मला उद्यां परत गांवीं जाणार होती म्हणून तीं दोघें हा वेळपावेतों गच्चीवर बसलीं होतीं. आपलं प्रिय माणूस गांवीं जाणार असलं म्हणजे, पुढें होणाऱ्या विरह जाणिवेनें उद्भवलेल्या मनाच्या आहाळतेनें त्या प्रिय माणसांपासून लवकर दूर होतां येत नाहीं. जितकं दीर्घकाल निकटचं सान्निध्य लाभेल तितकं लाभावं हा हेतु प्रबल होतो, तद्वत वसंत आणि निर्मला या दोघांचाही हाच हेतु प्रबल झाला होता. याच हेतुप्रबलतेनें, त्यांच्या पूर्ततेस्तव तीं दोघें वर गच्चीवर आलीं होतीं.

निर्मलेनें पांढरे पातळ परिधान केलें होतें. अंगांतही पांढरीच तोकडी कंचुकी होती. बुचड्याच्या स्वरूपांत मानेवर विलसणाऱ्या केशसंभारावर पांढऱ्या शेवंतीची चक्राकार वेणी तिचें सौंदर्य द्विगुणित करीत होती. तिच्या दोन्हीं कानांवर फुगलेल्या केसांच्या लहानशा झुबक्यांत शेवंतीच्या इवल्या–इवल्या पाकळ्या खोवल्या होत्या. मनगटांत पांढऱ्या कांचेचे एक एक व अत्यंत बारीक पण चकाकणाऱ्या मोत्यांचे एक एक कंकण विलसत होतें. मांसल दंडा-भोंवतीं कंचुकीची काळी बारीक नक्षीदार किनार शोभायमान दिसत होती. तिचे बारीक पतली अधरद्वय तांबूल सेवनानें तांबडे झाले होते. नेत्रांतून काजळाची कोर कोरली होती. त्या भोकरा-सारख्या टपोऱ्या पांढऱ्या शुभ्र बुबुळाभोंवतालचे काज-ळाचे कडे अती विलोभनीय दिसत होते. तिच्या अंग-सौष्ठवाचं वर्णन कालिदासाच्याच शब्दांत करायचं म्हणजे असं

करतां येईल—' ती तन्वी म्हणजे सडपातळ पण रेखीव अवयवाची होती. श्यामा म्हणजे कांळीसावळी नव्हे, तर तरूण–यौवनमध्यस्थ होती. दुलसगमना होती. निम्ननाभी होती. ......'

वसंतानें उलटे काष्टयाचें धोतर पेहेरलें होतें. अंगांत निमस्तीन (फ्रॉकसारखें दिसणारें बिन बाह्याचें तोकडें अगरखें) होती. केस उलटे फिरवून ठेवले होते. तो अंगानें चांगला सशक्त होता. त्याचे स्नायु पिळदार होते. चेहरा सुंदर–देखणा होता. त्याच्या सशक्त-पणामुळें तर तो जास्तच सुंदर दिसे.

गच्चीच्या कठड्यावर तीं दोघें बसलीं होतीं. बाजूस कांहीं लहान लहान फुलझाडांच्या कुंड्या ठेवल्या होत्या. रात्रीच्या त्या शांत मंद पवनाच्या झुळकीबरोबर नुकतेंच उमलण्यास सुरवात झालेल्या त्या कुंड्यांमधील कळ्यांचा मुग्ध सुगंध दरवळत होता. पलीकडे लांबवर समुद्राचें पसरलेलें पाणी–दिवसाचे वेळीं आरशाचे परिवर्त-नांत दिसणाऱ्या मोठ्या कांचेच्या भांड्यांतील हेलावणाऱ्या पाण्या–प्रमाणें–दिसत होतें.

त्या वेळचें तें वातावरणच मुळीं संमोहसमर्थक, उन्मादी अन् वृत्तींना धुंद करण्याइतकें समर्थ होतें! आधींच चैत्रांतील–वसंतऋतूं-तील पौर्णिमेची आल्हाददायक सुषमा, त्यांत शेजारच्या कुंड्यांतील उमलत्या कळ्यांची सौगंधता, पूर्ण एकांत मग वृत्तीं धुंद व्हायला अन् महिरून जायला असा कितीसा वेळ लागणार ?

वितनु—ज्याला मुळीं शरीरच नाहीं असा–वितनु अनंग मदन! नेत्र नसून पाहाणारा, कर्ण नसून ऐकणारा, हात नसून काम

करणारा आणि साध्या भ्रमरबंध पुष्पगुच्छमंडित धनुष्याच्या सहाय्यानें पुष्पाचेच गंधसुगंध बाण सोडून अंतःकरणांत कामाग्नी पेटविणारा अनंग-मदन—त्याचें त्या ठिकाणीं आगमन झालेलें !

वसंत आणि निर्मला, या दोघांच्याही सर्वांगाला या अनंगानें आग लावली. बेभान अवस्थेंत वसंतानें निर्मलेच्या खांद्यावर हात ठेवला. निर्मलेनें त्याच्या विशाल वक्षस्थलावर आपलें मस्तक टेकलें. केशभारावरील शेवंतीच्या वेणींतील मादक गंधता वसंताला आपोआप अवघ्राणण्यास मिळाली. त्या मादक गंधसुगंधानें तो जास्तच बेभान झाला. त्यानें तिची चिंचोळी मोहक हनुवटी वर उचलली अन् त्या अवखळ, अल्लड, अनास्वादित, यौवनमध्यस्थ निर्मलेच्या थरथरत्या ओठांवर आपले ओठ ठेवले.

*        *        *        *

निर्मलेच्या वडिलांचें निर्मलेस आलेलें पत्र वसंतास एकदां वाचायला मिळालें. वसंतानें तें वाचले आणि नंतर त्यानें निर्मलेसमोर ‘ आपण पत्र वाचलें ’ असें अगदीं प्रांजलपणें सांगितलें. तिनेंही त्याला त्याबद्दल कोणत्याच प्रकारचा दोष दिला नाहीं. उलट ‘ मी तुम्हांला दाखवणार होतेंच तें, पण विसरून गेलें मी ’ असं म्हणून, जणुं अपराधच केला नाहींत असं त्याला त्या शब्दानें तिनें सूचकतेनें सुचविलें. वसंतानें निर्मलेला ‘ तूं आतां परत जा ’ असें सांगितलें. त्या पत्रांतल्या मजकुराचें आणखी जास्त स्पष्टीकरण करून तिला पटवून देण्याचा त्यानें प्रयत्न केला. पण निर्मला तयार होईना. ती त्याच्याजवळ राहायच्या अट्टाहासाला पेटली होती. ती म्हणत होती—

"प्रत्यक्ष लग्न झालेलं नसलं, तरी आपलं जणुं लग्नच झालं आहे असा माझ्या मनाचा ग्रह झाला आहे. माझं हें वागणं चुकीचं असेल–आहेही. पण त्याला माझा नाइलाज आहे. मी सर्वस्वीं मन-दुबळी आहे. माझं मला कळतं आहे तें. प्रथम मीं लग्नच करायचं नाहीं अशी प्रतिज्ञा केली होती. आणि त्या प्रतिज्ञेच्या पूर्ततेसाठीं मी आपणांला टाळीत होते. आपल्या सान्निध्याला अन् सहवासाला आळा बसेल असा जास्तींत जास्त प्रयत्न करीत होतें. पण मला माझ्या मनदुबळेपणानं तें जमलं नाहीं. दुष्काळांतून उठलेला अन्नाला हापापत नाहीं कां,तशी मी आपल्या सहवासाला हापापली होतें–आहेही! आपला क्षणाचाही वियोग मला साहवणं शक्य नाहीं–साहवत नाहीं! माझ्या प्रेमांत विकृति असेल, मी नाहीं म्हणतच नाहीं, पण माझ्या दृष्टीनं खरं प्रेम तेंच, कीं जें कधींही एकमेकांस अंतर पडूं देणार नाहीं. रस्त्यावरून आंधळा भिकारी आणि त्याची काठी धरून भिकारीण चाललेली पाहिलं म्हणजे माझं अंतःकरण विचलित होतं. सिनेमांत नायकनायिकांचं सान्निध्य पाहिलं म्हणजे अंतःकरणांत कंप सुटतो. जिथं जिथं म्हणून प्रेमी युगुलं दृष्टीस पडतात तिथं तिथं त्या त्या वेळीं मला आपली आठवण होते अन् सान्निध्याची हाव बळावते.

मानसशास्त्राच्या दृष्टीनें माझी ही मनःप्रवृती अगदींच अपवादा-त्मक असेल, तरी पण माझ्या मनःप्रवृत्तींचीं लक्षणं हीं आहेत खरीं अशीं चमत्कृतिजनक अन् गूढ! मला आपल्यापासून दूर राहायलाच नको वाटतं. आपल्या सान्निध्यांत असतांना संकटांचें पर्वतही मी

हंसतमुखानें तुडवीन, पण आपलें सान्निध्य–साहचर्य हवें. मला वाटतं माझ्या या असल्या प्रवृत्तीचें थोडेबहुत विवेचन रसेलनें केलें असावें. ‘Impluse and Desire’ यांत त्यांनीं असल्या प्रवृत्तींची मामुली चर्चा केली आहे असं वाटतं. बहुधा तें नक्की नसावं! कुठल्याही विशिष्ट वस्तूवर बुद्धिपुरस्पर लक्ष देऊन कार्य करण्याची अत्युत्कट मनःप्रवृत्ती तिला तो ‘इच्छा’ ही पारिभाषिक संज्ञा वापरतो. माझी त्याच्या संज्ञेच्या कक्षेंत बसणारी ‘इच्छा’ किंवा थोडक्यांत आपणांवरील प्रेम हें या स्वरूपाचें (म्हणजे केवळ आपणांवर बुद्धिपुरस्पर लक्ष ठेवून केल्याचें व पूर्तीची आशा ठेवल्याचें प्रेम) आहे. मी माझी ही मनःप्रवृत्ती मुद्दाम पुढें केव्हांतरी एकाद्या लेखकाला सविस्तर सांगेन व याबद्दलचें विवेचनही त्याचेकडून करवून घेईन अथवा या प्रवृत्तीवर आधारून आपल्या जीवनावर एकादी कादंबरी तरी तयार करवून घेईन. तें पुढचं पुढं होईल, पण आज तरी मी परत जाऊं शकणार नाहीं. आपल्या वियोगाची कल्पनाही मला साहवणार नाहीं, मग प्रत्यक्ष वियोग तर मुळींच साहवणार नाहीं! प्रीतिबंधन हें इतकं बळकट अन् अभेद्य आहे, कीं तें तोडूं म्हटल्यानेंही तोडतां येणार नाहीं. माझ्या व्यतिरिक्त दुसऱ्या कुण्या स्त्रीवर आपणांला प्रेम करायचें असेल, तर खुशाल करा, मला त्याबद्दल विशेषसें वाईट वाटणार नाहीं. पण माझा त्याग करूं नका–मला तिरस्कारूं नका–मग आपण मला आपली मोलकरीण म्हणून मानलीत तरी हरकत नाहीं. माझं हें प्रेम उदात्त नसेल, हीनच असेल, पण मला मुळीं प्रेमाची व्यापकताच कळत नाहीं तिथं मी माझ्या प्रेमाची वर्गवारी तरी कशाला

करूं ? जें आहे तें अशा स्वरूपाचं आहे ! माझ्या या अशा प्रेम-वृत्तीकडे पाहून मला कोणी 'कामुक' म्हणतील ! असेनही मी कामुक ! पण जोंपर्यंत माझी प्रीत फक्त एकट्या आपणांवरच सर्वस्वीं केंद्रीभूत झालेली आहे तोंपर्यंत माझ्या प्रीतीला 'कामुक' या संज्ञेनं संबोधणं खरोखरी अन्यायाचं होईल. माझं आपणांवरील प्रेम निर्मल–निरपेक्ष आहे. त्याला कशाचीच-फक्त आपल्या साहचर्या-शिवाय–जरूरी नाहीं. शुद्ध प्रेमाला द्रव्याची, रूपाची, सुखोप-भोगाची, एवढेंच नव्हे; तर केलेल्या प्रेमाच्या परतभेटीचीही अपेक्षा नसते. उलट बाजूनें प्रेम केलें जावों वा न जावों, स्वत: प्रेम करीत रहाणें हेंच खरें कर्तव्यकर्म–हाच खरा आम्हां स्त्रियांचा धर्म ! आम्हीं आपणांवर प्रेम करूं–करीत राहूं–आपण कुणावरही प्रेम करा, पण आमचा त्याग करूं नका. प्रेमभरानें आमच्याकडून सेवा करूनघेण्याची संधी अक्षय अखंड आम्हांला मिळो हीच विनंती. या असल्या अत्यंतिक स्वरूपाच्या ध्येयनिष्ठ प्रेमांतच खरें सुख, खरा आनंद, खरें स्थैर्य, खरी शांती, खरा स्वर्ग आहे !"

आणि तिच्या या हटवादी पण मनाला सुख देणाऱ्या प्रेमळ विचारसरणींमुळेंच वसंताला आपला विचार फिरवावा लागला. जाण्यासाठीं बांधलेलें सामानही अखेर त्याला सोडवावें लागलें. वस्तुत: काल रात्रींच ती जाणार होती. पण वसंतालाही तिला लव-कर सोडवलें नाहीं म्हणून कालची रात्र चुकली.

प्रत्यक्ष निघेपर्यंत आपण आडकाठी करायची नाहीं किंवा कांहीं बोलायचेंसुद्धां नाहीं असेंच निर्मलेनें ठरविलें होतें. जेव्हां, सकाळीं सारी बांधाबांध करून वसंत उभा राहिला तेव्हांच तिने हें सारं त्याला व्याख्यान ऐकवलं व त्याचं मन पालटवलं.



## १३ कोर्टांत

Adultery–४९७, कलमाखालीं मोहनशेटजींनीं हिमांशूवर फिर्याद दाखल केली.

हिमांशू आणि हिराबेन यांचें एकमेकांवर प्रेम होतें—आहेही–हें आपणांस माहीत आहेच !

हिमांशूची आणि हिराबेनची वसंताच्या खोलींत अकस्मिक भेट झाली, आणि त्याच वेळीं मोहनशेटही तिथं आले हें आपणांस माहीतच आहे.

आपल्या बायकोवर हिमांशूचें प्रेम आहे आणि आपल्या बायकोचेंही हिमांशूवर प्रेम आहे हें मोहनशेटनां माहीत झालें होतें. कोळेगांवकरांनीं तर एकदां प्रत्यक्षच मोहनशेटच्या कानांत विष

ओतलें होतें, आणि तेव्हांपासून तर मोहनशेटच्या मनांत हिमांशूचा कांटा केव्हां काढीनसें झालें होतें. त्यांच्या मनांत ही गोष्ट रुतलेल्या कांट्यासारखीं सलत होती. पण ही अब्रूची, म्हणजे अत्यंत नाजूक अशी गोष्ट होती. बोलून स्फोट करण्यासारखी क्षुल्लक होती थोडीच! घरांत विषारी साप निघावा, तो अत्यंत अडचणीच्या जागीं दिसावा, अशा वेळीं घरच्या माणसाची स्थिति कशी होत असते;तशीच-किंबहुना त्याहींपेक्षां ज्यास्त बिकट स्थिति मोहनशेटची झाली होती. साप पाहून, 'त्याला धरावं तर चावतो, न धरावं तर पळतो' अशी मोठी शोचनीय स्थिति होत नाहीं का ? तसंच, हिमांशूला बोलावं तर अब्रूची खराबी ! शिवाय त्याचेकडून अपमान—'तुमचा रुपया बट्टा त्याला आम्ही काय करायचें ?' असें झणझणीत हिमांशूनें उत्तर दिलें म्हणजे मुकाट खालीं मान घालणेंच आलें कीं नाहीं त्यांच्या नशिबीं ! बरं, त्याला ठेचावं, तर परिणाम भलताच होण्याचा संभव. शिवाय स्वतःची बायकोच त्याला सामील. म्हणजे एकूण तोंड दाबून बुक्याचा मार !

मोहनशेट हे जसे रंगेल, हौशी तसेच धनलोभीही आहेत. धनलोभास्तवच त्यांनीं हिराबेनचा त्याग केला हें मागें सांगितलें आहेच. तशी हिराबेन सुंदर नव्हती असें मुळींच नाहीं, पण रंगेल अशा मोहनशेट श्रीमंत—परभृताला त्या सौंदर्याची तमा थोडीच असणार ? अन् अशा रंगेलांना एकनिष्ठेचं थोडसं वावडंच असतं. त्यांना नित्य नवं हवं असतं. व ते आपली ही नव्याची तहान परस्पर भागवून घेतातही. फरक इतकाच, कीं नव्याची तहान भागवितांना जुन्याचा सर्वस्वीं

त्यागच करायचा हें त्यांना शक्य नसतें. तें शक्य होण्याला इतरही कांहीं प्रभावी कारणं घडून यावीं लागतात. धनलोभी मोहनशेटना गिरणीची मालकी आतांच आपल्याकडे यावी असं वाटणं साहजिक होतं. हें शक्य होण्यासारखं नाहीं असं वाटतांच त्यांनीं हिराबेनचा त्याग केला.

स्वतः कितीही उनाडक्या मारीत फिरलं तर त्यांत कांहीं नाहीं, पण आपल्या बायकोचं चारित्र्य मात्र शुद्ध असावं ही कोणाही आजच्या हिंदी पुरुषाची—नव्हे, जगांतल्या कुठल्याही व्यक्तीची प्रवृत्ति असते. मोहनशेटना ज्यावेळीं कोळेगांवकरांनीं तिखटमीठ लावून सांगितलं, त्यावेळींच शहानिशा करून घ्यावी असं वाटत होतं. पण त्यांच्या अनावर रागाला थोपवून धरायला स्वतः कोळेगांवकरांनींच श्रम घेतले.

पण कांहीं झालं, तरी मनुष्याच्या सहनशीलतेला मर्यादा असते. कोळगांवकरांच्या सांगण्यावरून त्यांना जें कांहीं कळून आलं होतं, त्याचा प्रत्यक्ष छडा घेण्याचा त्यांनीं फार प्रयत्न केला. पण अगदीं मामुली गोष्टीशिवाय कांहीं सुद्धां दिसून आलं नाहीं. तेव्हां तर त्यांनीं या गोष्टीकडे कानाडोळा करायचंच धोरण ठेवलं; पण जेव्हां वसंताच्या खोलींत हिराबेन आणि हिमांशु यांना त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलं, तेव्हां त्यांचा राग अनावर झाला, आणि सारासार विचार न करतां त्यांनीं प्रथम हिमांशूला हातांतल्या काठीनें पांच सहा तडाखे जोरानें मारले. नंतर त्यांनीं हिराबेनलाहि मारलें. शेवटीं विभाकरानें त्यांच्या दंडाला धरून त्यांना खालीं आणलें व त्यांतून सर्वांची सुटका केली.

घरीं आल्यानंतर मोहनशेटनीं झाल्या प्रकारचें थोडेसें चिकित्स-कतेनें आपल्या मनाशींच विवेचन केलें. तेव्हां त्यांना त्याचा परिणाम भलताच होण्याचा संभव वाटूं लागला. हिमांशूनें जर कदाचित आपणांवर मारल्याबद्दल फिर्याद केली तर–असाही विचार त्यांच्या मनांत डोकावलाच. तेव्हां त्यांतून निभावून नेण्या-साठीं त्यांनीं निराळीच तोड काढली. हिमांशूनें फिर्याद दाखल करण्यापूर्वी आपणच त्याच्यावर फिर्याद केली तर ?

साहजिकच मोहनशेटजींनीं यावेळीं अब्रूसंबंधीं फारसा विचार केला नाहीं. गळ्यापर्यंतच बेतल्यावर मनुष्य वाटेल तें करायला तयार होतोच कीं ! त्यांतलाच हा प्रकार !

आपल्या बायकोशीं अनैतिक संबंध ठेवणारा, या सदराखालीं त्यांनीं हिमांशूला ४९७ कलमाखालीं कोर्टांत खेंचून आणलें.

* * * *

नुक्तीच हिराबेन वयांत आली होती.

लग्नापूर्वीपासूनच सुंदरजींचा आणि कोळेगांवकरांचा घरोबा वाढला होता.

हिराबेनच्या सौंदर्याची पकड विषयलोलुप कोळेगांवकरांच्या मनावर बसली. त्यांनीं त्याबद्दल फार श्रम केले. पण एवढं खरं, कीं त्यांनीं जे श्रम केले ते आपल्या बडेजावीला धक्का न लागतील अशा सावधगिरीनें. पण हिराबेन त्यांना मुळींच वश झाली नाहीं. तेव्हां त्यांच्या मनांत तिचा सूड घ्यायचा असें आलें आणि हिमां-

शूची ही संधी दिसतांच सूडपूर्तीच्या भावनेनेंच त्यांनीं मोहन-शेटनां ती बातमी तिखटमीठ लावून सांगितली. एवढ्यावरच ते स्वस्थ राहिले नाहींत. तर—

बंगल्याच्या मागील बाजूस असलेल्या बागेंत एकदां हिराबेन व हिमांशु सहल करीत होते. त्यावेळीं त्यांनीं त्या दोघांनाही पाहिलं. साधारण अंधार पडल्यानंतर हिमांशु निघून गेला. त्यानंतर कोळे-गांवकरांनीं हिराबेनला बोलावून घेतलं. तिला आपण काय काय पाहिलें आणि ऐकलें हें सांगितलें व आतां ही गोष्ट मी तुझ्या पतीच्या कानांवर घातली तर— अशी धमकीही दिली. पहिल्या क्षणाला हिराबेन घाबरलीच ! तिची ती भित्री अवस्था पाहून कोळे-गांवकरांना आपल्या कुटिल हेतुपूर्ततेची आशा सफल करून घ्यावीसें वाटलें व त्यांनीं तसें बोलूनही दाखवलें. पाय पडला रे पडला, कीं नागीण कशी एकदम फूत्कारते, तद्वत हिराबेन त्यांचा तो कुटिल हेतू पाहून एकदम चवताळली व त्या भरांत त्यांची तिनें अगदीं शेलक्या शब्दांनीं पूजा बांधली.

मग, आतां तर काय, त्यांचा द्वेष परमावधीला गेला. त्यांनीं मोहनशेटना सारं कांहीं सांगितलं.

मोहनशेटनां हा घोटाळा कळून येण्यापूर्वीं ही अशी हकीगत घडून आली. ही हकीकत घडून आली नसती, तर कदाचित मोहन-शेटना अद्यापपावेतों कांहींच कळून आलं नसतं.

* * * *

१०८ कलमाखालीं विभाकरावर फिर्याद गुदरली. विभाकराला

मुंबईंत येऊन बरेच दिवस झाले होते. मोहनशेटबरोबर सरदारगृहांत जेवायचं आणि इतर वेळ गांवांतून भटकायचं असा त्याचा क्रम असे !

'आदर्श चित्र संस्था' या सिनेमा कंपनीच्या डायरेक्टरांना विभाकराला नोकरी वगैरे कांहीं नाहीं हें माहीत होतें. विभाकराची खरी स्थिति काय आहे हें त्यांना माहीत असायला कांहींच कारण नव्हतें.

विभाकर सुहासला भेटायला कंपनींत केव्हां केव्हां जात असे. आणि डायरेक्टरांना तें माहीत झालं होतं.

आदर्श चित्र संस्थेनें एका नव्या सिनेमाचं शूटिंग सुरू केलं होतं. त्यांत सुहासला काम दिलं होतं. सुहासचं काम फार चांगलं होतं असं मुळींच नव्हे. त्या सिनेमांत डायरेक्टर–महाशयांच्या आग्रहावरून सिनेरिओ रायटरनें एक नर्तनाचा देखावा लिहिला होता. वेश्येच्या माडींत होणारा तो नाच दाखवायचा होता. तेवढ्यासाठीं त्यांनीं सुहासची योजना केली होती.

सुहासचें अंगसौष्ठव प्रमाणबद्ध, रेखीव अन् मोहक होते. सबब नृत्यासाठीं डायरेक्टरांना तिची योजना करणें जरूर अन् रास्तच वाटलें.

एकदां नोकरीच पत्करल्यानंतर आतां तक्रार करण्यांत कांहीं हंशील नव्हे, असा विवेक सुहासनें केला. आपल्याला अशा प्रकारचं कांहीं काम मिळेल अशी सुहासची इच्छा असती, तर तिनें करार करतेवेळींच कांहीं बंधनें लादलीं असतीं. पण पुढें येणाऱ्या कृत्यांची कल्पना आधीं होणें कसें शक्य आहे ? 'आधीं खावं कां आणि

मग कुंथावं कां ?' अशी एक म्हण आपल्या मराठींत आहे. तशीच स्थिति सुहासची यावेळीं झाली.

रोज सुहासची नृत्याची तालीम होत असे. तिला जरूरीपुरते नाचाचे धडे देण्यांत आले.

तालिमेच्या वेळीं सुहासच्या मनांत काय काय विचार येत असतील हें एक तिचें तीच जाणें—इतरांना त्याची कल्पनासुद्धां येणें शक्य नाहीं.

आपण कोण ? कुठलें ? सध्यां आलोंत कुठें ? करतों आहोंत काय ? कुठल्या अविचाराला बळी पडून आपण जाणून बुजून या खड्ड्यांत उडी घेतली ? असे एक कां दोन, कितीतरी विचार सुहासचे मनांत येत असतील.

कांहीं दिवसानंतर सुहासची नृत्याची तालीम पोषाकासह होऊं लागली. सुहासला प्रत्यक्ष सिनेमांत नृत्य करतांना जो पोषाक देण्यांत येणार होता, तोच पोषाक यावेळीं—म्हणजे तालिमचे वेळीं—देण्यांत येत होता.

विकच्छ, पण तेंसुद्धां गुडघ्यापर्यंतच किनार येणारें तलम विरळ रेशमी वस्त्र कमरेपर्यंत नेसायचं. त्यावरून मोत्याची पेटी लोंबत ठेवून त्या पेटीचे तीन तीन पदर दोन्हीं मांड्यावरून सोडायचे. वर फक्त एक कंचुकी, पण तीसुद्धां बिन बाह्याची ! दंडावर मोत्यांची वाकी—छे, जाऊं द्या, वाचक महाशय कल्पनेनेंच जाणा तो पोषाक कसा असेल तें !

अगदीं पहिला दिवस होता. सुहास व्यवस्थित वेशभूषा करून तालिमसाठीं बाहेर आली. नृत्यशिक्षक वाटच पाहात होता. तिचा

तो त्यावेळचा पोषाक, पायांतल्या नुपूराचा कर्णमधुर रुमझुम् आवाज आणि संपूर्ण स्पष्ट मोहक सौष्ठव—ताबा उडाला त्याच्या मनावरचा आणि त्या नृत्यशिक्षकानें झटकन् तिला कवटाळलें व तिचें चुंबन घेतलें.

अभावितपणें घडून आलेल्या या प्रसंगानें सुहास भेदरलीच! त्या दिवशीं अर्थातच तालीम झाली नाहीं हें काय निराळें सांगायला हवें?

कंपनींतली नटी शीलोत्तमा हिनें दुरून हा प्रकार पाहिला होता. तिच्याशिवाय मात्र कुणालाच माहीत नव्हतं हें! साहजिकच सुहासबद्दल शीलोत्तमेचा कांहींतरी निराळाच ग्रह झाला. आणि हाच ग्रह सुहासला मसाज हॉलमध्यें नेण्यास कारणीभूत झाला.

सुहासनें विभाकर आल्यानंतर त्याला ही हकीकत सांगितली. विभाकरानें तिला 'मी हें काम करणार नाहीं' असें डायरेक्टरांना सांगण्यास सांगितलें. एवढ्यावरूनही त्यांनीं नाहींच ऐकलें, तर मग पुढील उपाय करूं असें त्यांनीं सुहासला सांगितलें.

आपण योजलेल्या कार्यांत कोणी अडथळा केला असेल हें डायरेक्टर—महाशयांनीं ताबडतोब जाणलें व त्यांनीं त्यावर उपायही केला.

काम नाहीं, धंदा नाहीं, उनाडक्या करीत हिंडतो. कंपनींतल्या नटींना फसवतो—फुसलावतो या आशयाखालीं त्यांनीं पोलिसाकडे अर्ज टाकला. पोलिसांनीं विभाकराला अटक केली आणि त्याच्यावर १०८ कलमाखालीं फिर्याद चालूं कली.

मोहनशेट स्वतः जामीन राहिले व प्रथम त्याला त्यांनीं सोडवून आणले. आणि पुढेंसुद्धां हा माझ्याकडे माझा खासगींतला नोकर आहे. सुहासची त्याची पूर्वींची ओळख आहे. हा नोकरमनुष्य आहे. उनाडक्या करीत फिरणारा कोणी मवाली नाहीं असें सांगून विभाकराची निर्दोष मुक्तता केली.

*   *   *   *

हिराबेनची कोर्टांत जबानी चालूं होती. हिराबेननें लाजलज्जा सोडून सारं कांहीं स्पष्ट अन् प्रामाणिकपणें कोर्टांत बोलायचं असं ठरविलं. जबानी चालूं होण्यापूर्वीं हिराबेननें कोर्टाला आपली जबानी अगदीं निवडक माणसांसमोरच खासगी स्वरूपांत व्हावी अशी विनंति केली. कोर्टानें ती मान्य केली व तत्काल प्रेक्षक-वर्गाला बाहेर होण्याचा हुकूम केला आणि अगदीं निवडक माणसांसमोर जबानीला सुरवात केली.

' मी यांची–मोहनशेटची–धर्माची पत्नी. लग्न झाल्यानंतर यांनीं मला फारच थोडे दिवस आपणांजवळ वागवलं, त्यानंतर त्यांनीं मला माहेरीं आणून सोडलं. तें अद्यापपावेतों मी माहेरींच आहे.

अत्यंत लहान अशी एकादी ठिणगी कागदाच्या चिठो-ऱ्यांत कुठें पडली तर ती पेट घेत जाते आणि कांहीं क्षणांत तर ज्वाळा भडकूं लागतात हें आपणांला माहीतच असेल ! माझं तरूण वय, साऱ्या सुखसोयींची अमूप अनुकूलता, स्वैर वातावरण आणि भावनांची अमर्याद सळसळ, या साऱ्यांचा कांहींच परिणाम होणं शक्य नाहीं काय ? माझा त्याग

करायला यांचीं आणखी इतर कांहीं कारणं असतील, पण माझं रूप तर वाईट नाहीं ना ? रूपासाठीं तरी यांनीं माझा खास त्याग केलेला नाहीं. त्यांच्या त्यागानें, ज्या भावनांची परिस्फुटता होणें शक्य झालें नसतें त्या माझ्या अंतर्यामांतील कढणाऱ्या भावनांची आपोआप स्फुटता झाली–त्यांना वाचा फुटली. व त्यांनीं आपली असह्यता शमवून घेतली. हेंच त्यांनीं माझा त्याग केला नसता तर अशा आड वाटेनें सुखाचा पल्ला गांठण्याची मला कांहींच जरूरी भासली नसती.

त्यांनीं घरचीला दारीं लोटलं आणि दारचीला घरीं घेतलं. घरचीला उंबरठा बंद केला आणि दारचीला उंबरठ्याबाहेरही न येण्याइतकी व्यवस्था केली. त्याशिवाय आणखी किती दरवाजाच्या कडीवर यांनीं थाप मारली असेल तें एक त्यांनाच माहीत. यांना मात्र हे थेर करायला मुभा आणि माझ्याच पावित्र्यावर एवढा कां दाब ? धर्मासाठीं म्हणून ! माझ्या पावित्र्यावर धर्माची दुधारी तरवार ? कां म्हणून ? मलाही कांहीं वासना–भावना नाहींतच कां ? त्यांच्या पूर्ततेसाठीं मी कांहीं खटपट करूं नये कां ? यांच्या कुठल्याही आणि कसल्याही किळसवाण्या कृतीला मी बंदी आणूं शकलें नसते–हरकतसुद्धां मी घेतली नसती, पण त्यांनीं मला नीट तर राहोंच, पण कांहींशा मामुली सुधेपणानं वागवलं असतं तर आज ही गोष्ट या थराला येती ना !

हिमांशु कोण, कुठले याची मला प्रामाणिकपणें सांगते, कांहीं माहिति नाहीं. त्यांची माझी प्रथम भेट कुठें झाली हेंही आठवत नाहीं. बहुतेक मोटारबसमध्यें झाली असावी ! त्यानंतर त्यांचं

जाणंयेणं आमच्याकडे वाढूं लागलं. अर्थात् या गोष्टीला माझी पूर्ण सम्मति होती आणि पुढें पुढें तर---

वसंतराव वेलिणे यांच्या घरीं मी वसंतरावांच्या भेटीसाठीं गेलें होते. त्या ठिकाणीं हिमांशु येतील भेटतील ही कल्पनासुद्धां नव्हती. हिमांशूना एकदां माझ्याजवळची एक फ्रेम केलेली तसबीर मी दाखविली. त्या तसबिरींत माझ्या पतीचे शेजारीं एक बाई बसली होती. त्या बाईकडे हिमांशूंनीं न्याहाळून पाहिलें. मला तिचा पत्ता विचारला, मी सांगितला. तो त्यांनीं टिपून घेतला. ती बाई माझ्या पतीजवळ अद्यापि आहे. हिमांशूचें व त्या बाईचें काय संबंध असावेत हें मला कळायला कांहींच साधन नव्हतें. आणि अद्यापिही मला त्या गोष्टीची कांहीं कल्पना आलेली नाहीं.

हिमांशूनीं पत्ता लिहून घेतला. नंतर ते जे बाहेर पडले ते मला पुन्हां भेटलेच नाहींत. मी सहज वसंतरावांकडे म्हणून गेलें तों त्या ठिकाणीं मला ते दिसले. आमचें आधीं ठरलेंच नव्हतें कांहीं-सुद्धां. मूळ भेटच नाहीं, तर ठरणार तरी काय आणि कुठें ?

त्या ठिकाणीं मला जाऊन पांचसुद्धां मिनिटें झालीं नसतील तेवढ्यांत माझे पती एका स्नेह्याला घेऊन वर आले. आणि आम्हां दोघांनांही त्यांनीं मारहाण केली. '

* * * *

हिमांशूची जबानी—

'हिराबेनची माझी ओळख प्रथम मोटारबसमध्यें झाली. ओळखीनंतर परिचय वाढला, त्या परिचयाचं रूपांतर पुढें प्रेमांत झालं. हिराबेन विवाहित असेल असं मला मुळींच वाटलं नाहीं. शिवाय हिरा-

बेनचं वयही इतकं पुढं गेलं असेल असं मला कदापि वाटलं नाहीं. आजही तिच्या शरीरसौष्ठवावरून तिच्या खऱ्या वयाचा कोणी अंदाज घेण्याचा प्रयत्न केला, तर काय आकडा निघेल हें कोर्टानें जरूर अजमावून पाहावें. मी कधींच तिच्या वयाची अथवा चारित्र्याचीसुद्धां चौकशी केली नाहीं. एकदां सहज हिनेंच मला एक फोटो दाखवला. त्यांत मोहनशेट व त्यांचे शेजारीं एक स्त्री होती. ती स्त्री माझी आई आहे. जन्मापासून मी माझ्या दुर्दैवानें तिच्या सहवासाला मुकलों होतों. त्या दिवशीं हिराबेन कोण काय वगैरे सारं मला कळलं ! आणि तेव्हांपासून मी त्यांच्या घरींच जाणें सोडून दिलें.

वसंतराव वेलींणे हे माझे स्नेही आहेत. आम्ही दोघे शाळासोबती आहोंत. मी नुक्ताच प्रणयपूरहून आलों होतों. वसंतरावांना भेटायला म्हणून मी त्यांच्या घरीं गेलों. त्यांच्या खोलींत मला हिराबेन भेटली. ती तेथें कशासाठीं आली होती हें मला माहीत नाहीं.

त्यानंतर एका तरुणाबरोबर मोहनशेटही आले. आणि अखेर हा प्रकार झाला. '

* * * *

हिमांशूची जबानी झाली. निकाल पुढील तारखेवर ढकलला गेला आणि कोर्ट बरखास्त झालें.

हिमांशु कोर्टाबाहेर पडला.

पण दुसऱ्याच दिवशीं पोलिसांनीं त्याला पकडलें. आणि त्याच्यावर फिर्याद गुदरली.

पालिसांनां खुनाचा वहीम आला. गुप्त पोलिसखात्यांच्या शिफारसीवरून त्याला पकडण्यांत आलें.

---

## १४ चतुर्भुज

विभाकराचा संबंध तुटल्यापासून रत्नाची वर्तणूक बरीच एककल्लीपणाची अन् तुसटपणाची दिसून येऊं लागली.

पहांटे साडचार-पांचच्या सुमारास उठावं, प्रातर्विधी आटोपून तंबोरा घेऊन गाण्याची तालीम करावी. सात वाजतां तंबोरा खालीं ठेवून चहापान करावं-स्नान वगैरे उरकून नंतर नृत्याला उभं राहावं असा तिचा रोजचा क्रम असे.

दुपारीं जेवण झाल्यावर सहसा ती कधीं झोंपत नसे. अगदींच सुस्ती आली तर तेवढ्या वेळेपुरतीच ती लवंडत असे. पण बहुधा दुपारीं भरतकाम करण्यांत अगर एकादें पुस्तक-अर्थात् कादंबरी-वाचण्यांत ती गुंग होई.

प्रेमभंगाच्या व्यथेनें ती जर्जर झाली होती. तिचें मुखकमल आतां पहिल्यासारखें टवटवीत दिसत नव्हतें. तिच्या डोळ्यांत आरक्तता होती, पण ती पहिल्यासारखी—म्हणजे नुकत्याच उमल-लेल्या गुलाबासारखी ती मनोज्ञ नव्हती, तर सुकून निस्तेज झालेल्या गुलाबाच्या फुलाप्रमाणें ती दिसत होती. अलीकडे तिनें केशभूषे-कडेही लक्ष देण्याचें सोडून दिलें होतें. केश विंचरणें आवश्यक म्हणूनच ती रोज विंचरीत असे, पण त्यांतली तिची पूर्वींची कलात्मकता आतां लुप्त झालेली दिसत होती.

फेस पावडरची उधळण—स्नो क्रीमचा आणि अत्तराचा घमघमाट आतां नाहींसा झाला होता. सदा हंसरा दिसणारा तिचा मुखचंद्र आतां अस्ताला गेला होता. अमावास्येच्या काळोख्या रात्रीची घनदाट छाया आतां तिच्या मुखावर पसरलेली दिसत होती.

ही तिची पूर्वींची केविलवाणी स्थिति दिसत होती आणि आतां तर तिच्या या स्थितींत भीतीचीच भर पडली होती.

एकदां मोहनशेट सायंकाळीं आपल्या खोलींत एकटेच वर्तमानपत्र वाचीत बसले होते. रत्ना हळूंच आंत गेली आणि भीत भीत त्यांच्यापुढें उभी राहिली.

मोहनशेटनीं वर मान केली. डोळ्यावरचा चष्मा उजव्या हातानं वर कपाळावर सरकावला आणि रत्नाकडे दृष्टी टाकली.

रत्नाला विभाकरांचा आणि मोहनशेटचा स्नेह असेल हें माहीत नव्हतें. तिनें भीतभीतच पण साद्यंत हकीकत मोहनशेटना निवेदली

आणि कसंही करा, पण विभाकराशीं आपलं लग्न होईल अशी खटपट करा. अशी त्यांची रत्नानें विनवणी केली.

*　　*　　*　　*

रत्ना—विभाकराचा असा कांहीं संबंध असेल याची पुसटशीसुद्धां कल्पना मोहनशेटना नव्हती. रत्नानें जेव्हां सांगितलं, तेव्हां प्रथमतः तर विश्वासच वाटेना; पण नंतर मात्र त्यांना खरं वाटूं लागलं. विभाकराची विलासप्रिय वृत्ती त्यांना आतां माहीत झाली होती. साहजिकच त्यांना तें खरं वाटलं. विभाकराचा त्यांना प्रथम राग आला. अशा बाहेरख्याली इसमानें आपल्या घरांतच असा गोंधळ घालावा हें त्यांना पटलें नाहीं. कुणालाही पटलें नसतेंच, मग तें त्यांना तरी कसें पटेल ? त्यांना राग आला हें खरें, पण नंतर त्यांनीं आपला राग आवरला. आणि शांतपणें झाल्या गोष्टीवर विचार केला. स्वतःचें आणि रत्नाचें नातें मनांत आणलें. आणि स्वतःवरून त्यांनीं झाल्या गोष्टीकडे अजमावून पाहिलें. विभाकर आपल्या पश्चात घरीं येत होता याचं त्यांना आश्चर्य वाटलं आणि असं असतांना व इतक्या थराला ही गोष्ट गेली तरी आपली आणि विभाकराची घरीं चुकूनसुद्धां गांठ पडूं नये याचा त्यांना अचंबा वाटला.

मोहनशेट विलासप्रिय होते, तसेच ते सुज्ञही होते. आणि ते सुज्ञ होते म्हणूनच त्यांनीं या गोष्टीकडे दूषित नजरनें पाहिलं नाहीं. आकांडतांडव केलें नाहीं.

विभाकर! त्यांचें विचारचक्र विभाकर या व्यक्तीभोंवतीं फिरूं लागलें. त्यांना विभाकर ही व्यक्ती अजब दिसूं लागली. आजपर्यंत खुद्द मोहनशेटनींही आपल्या विलासीवृत्तीच्या शमनास्तव 'अनेकांच्या' ओळखीचा आस्वाद घेतला होता. पण त्यांच्या या बाबतच्या ओळखी दृढ कधींच झाल्या नाहींत. आणि विभाकराच्या मात्र दृढ-पूर्ण परिचित-चिवट-अभंग-व्हाव्यात याचें त्यांना का न नवल वाटावें?

विभाकराचें आपल्या रत्नावर प्रेम आहे, कां—त्या—त्या—दुसऱ्या मुलीवर प्रेम आहे याचा निर्णय त्यांच्या मनाशीं होईना!

'त्या' मुलीची त्यांना फारच थोडी माहिती होती. 'ती' मुलगी आपल्याच गांवांतली होती, चांगल्या घराण्यांतली होती हें त्यांना माहीत होतं. पण कशी आणि कां, 'ती' मुलगी 'त्या' ठिकाणीं आली हें त्यांना कळेना!

'त्या' मुलीची विनवणी त्यांना आतां आठवूं लागली. आतां त्यांना त्यावेळच्या त्या कृतीची खंत वाटूं लागली. आपण आपल्याच-साठीं कसें अमानुषपणें वागतों हें त्यांना कळून आलें.

पण! त्यावेळीं शॉंपेनची मधुर मादकता साऱ्या वृत्तींत सामावली होती. बेहोष पण मादक वृत्तींनीं पूर्ततेसाठीं 'त्या' मुलीच्या विन-वणीकडे दुर्लक्ष करून आपली लालसा तृप्त करून घेतली होती. हें त्यांना आठवूं लागले. 'ती' क्षणाक्षणाला आपली विनवणी करीत होती, तर उलट आपणच 'तिला' कसें बेगुमानपणें उत्तर दिलें हें त्यांना आतां आठवलें.—'इतकी सोवळी-पतिव्रता आहेस,

इतकी आर्जवं करते आहेस, तर मग या इथं असल्या खांईत आलीस तरी कां ?' हेंच तें त्यांनीं उच्चारलेलं वाक्य.

*  *  *  *

**ही 'ती' मुलगी कोण ?**

दुसरं कोण असणार ? सुहास !

मुंबईत सुहासची आणि मोहनशेटची भेट झाली होती. गावांत वावरतांना मोहनशेटनीं सुहासला अनेक वेळां पाहिलं होतं. त्यांच्या आसावल्या मनाला सुहासची भुरळ पडली होती. पण तिचा हव्यास कधीं त्यांनीं धरला नव्हता. अचानकपणें आणि तेंही अगदीं चमत्कारिकच ठिकाणीं सुहासची त्यांची भेट झाली, मग त्यांच्या साऱ्या सुप्त शक्ती कां न उफाळून याव्यात ? तशांत दारूची धुंदी !

सुहासच्या मनीबॅगेंत सहजच त्यावेळीं त्यांनीं हात घातला. त्यावेळीं त्यांना विभाकराचा फोटो दिसला होता. पण त्यावेळच्या मादक नजरेमुळें काळजाचा ठाव त्या फोटोला घेतां आला नाहीं.

सुहासनें विनवणी कां केली हें त्यांना आत्तां कळून आलें. आपल्याच गांवांत राहाणाऱ्या एका धनिकाची आणि आपली अशा चमत्कारिक स्थळीं—आणि तेंही नकळत—चुकून या ठिकाणीं आपण आलों असतांना गांठ पडावी आणि त्यायोगें आपल्या चारित्र्यावर झगझगीत प्रकाश पडावा ही कल्पनाच मुळीं दुःसह आहे. अशा वेळीं आपण त्यांतले नाहींत, चुकून इथं आलों असं मुरब्बी व्यक्तीसुद्धां बोलते, मग सुहास तर काय, नुकतीच जगाच्या

प्रांगणांत आलेली, आणि तेंही ह्या प्रांगणांतल्या खाचखळग्यांतच रुतलेली !

वाचकहो, जास्त बुचकळ्यांत आपणांला पाडीत नाहीं. बहुधा एवढ्यावरून सुहासची अन् मोहनशेटची कुठें भेट झाली असेल हें आतां कळून आलें असेलच ! पण मी त्याची स्फुटता करणें योग्य आहे.

सुहास शीलोत्तमेबरोबर एकदां मसाज हॉलमध्यें गेलेली होती ना ? तिथंच मोहनशेटही गेले होते.

*  *  *

रत्नाशीं लग्न करण्याबाबत विभाकराला पहिल्यानें सुधेपणानें सांगून पाहावें असें मोहनशेटनीं ठरविलें. तें न जमल्यास धमकी द्यावी असा बेत केला. पण या दोहोंपेक्षांही निराळ्याच घटनेमुळें त्यांचें कार्य यशस्वी झालें.

विभाकराला जेव्हां अटक झाली, तेव्हां मोहनशेटनीं त्याला सोडवून आणलें. पण तत्पूर्वी त्यांनीं त्याचेकडून रत्नाशीं विवाह करीन असें वचन घेतलें. विभाकराला रत्ना नको होती असं थोडंच आहे ? शिवाय आतां तर तो पेंचांत सांपडला होता. असं गोड वचन देऊन जर आपली निर्दोष मुक्तता होते आहे तर तो कां न वचन देता ? त्यानें वचन दिलें. मोहनशेटनीं त्याची जामिनावर मुक्तता केली आणि निकाल लागण्यापूर्वींच त्यांनीं रत्ना–विभाकराचा विवाह उरकून घेतला. विभाकर तसा चतुर्भुज होण्याऐवजीं असा चतुर्भुज झाला.



# १५ दोघेही अटक

कोळेगांवकर आणि प्रणयपूरकर यांचा खून झाल्या दिवसां-पासून पोलिसांचा तपास चालूं होताच. पैकीं हिमांशूनें चिंचेच्या झाडाखालीं उभें राहून लागोपाठ तीन गोळ्या झाडल्यानंतर तिथून पळ काढला होता. पळतांना त्याच्या पायांतील एक वहाण निसटली त्यावेळीं, आपण वहाण घ्यायला थांबू, तर कदाचित कोणी आपला माग काढीत येत असल्यास त्याच्या हातीं सांपडूं अशी साधार भीति वाटल्यावरून त्यानें ती पडलेली वहाण तशीच पायानें लाथाडून जवळील गटारांत फेंकून दिली आणि दुसरीही उकीरड्यावरील टोपलींत फेंकून दिली व पळ काढला. झाडाखालीं उभें राहून गोळी झाडतांना त्याचा हातरुमाल खिशांतून पिस्तूल

काढतेवेळींच खालीं पडला होता. परंतु त्यावेळीं तें त्याला समजलें नाहीं. नंतर जेव्हां आपला हातरुमाल गमावला आहे असं त्याला वाटलं, तेव्हां पहांटेच्या नंतर सहज म्हणून त्यानें महाराजा चौकांतून चिंचेच्या झाडाखालून चक्कर मारली. पण त्यावेळीं त्याला तेथें हातरुमाल दिसला नाहीं. तेव्हां दुसरीकडे कुठेंतरी पडला असेल अशी त्यानें आपल्या मनाची समजूत करून घेतली.

इकडे अपेक्षित छोटेसें स्टेशन येतांच वसंत थर्डक्लासमधून उतरला आणि गाडी हालल्यानंतर तो रावबहादुर प्रणयपूरकर ज्या सेकंडक्लासच्या डब्यांत बसले होते त्या डब्यांत चढला. त्याला पाहिल्यावर प्रथम रावबहादुर बरेच विस्मित झाले. म्हणजे, त्याचा व रावबहादुरांचा परिचय नव्हता असें कांहीं नव्हे. पण तो असा अकस्मिक आणि तेंही सामानसुमान कांहीं जवळ नसतांना डब्यांत चढलेला पाहून त्यांना विस्मय वाटला, इतकेंच. त्यांनीं आपल्याला वाटलेला विस्मय वसंताला बोलूनही दाखवला. वसंतानें हंसत हंसत त्यांचा तो विस्मय त्यावेळीं दूर केला.

वसंताच्या चेहऱ्यांत यावेळीं फरक पडला होता. आणि तसा फरक पडणें साहजिकच होतें. आपल्या मनांत चाललेली खळबळ तो शक्यतों बाहेर दिसूं न देण्याची जास्तींत ज्यास्त खटपट करीत होता. तथापि त्याची ती कावरीबावरी अवस्था रावबहादुरांना जाणवल्याशिवाय राहिली नाहीं. पण उगाच त्याबद्दल विचारून, त्याचें कांहीं गौप्य असल्यास काळजाला हात घातल्यासारखें होईल असा विवेक करून ते स्वस्थ राहिले.

केवळ, हिमांशूच्या आईला देशोधडीला लावलं आणि हिमांशूनें सांगितलं म्हणूनच वसंत रावबहादुरांचा खून करण्यास प्रवृत्त झाला होता असें नव्हे. त्याला आणखीही एक कारण होतें. तें फार नाजूक अन् गूढ होतं, पण तितकेंच सात्विक संतापाला चेव आणणारे होतें.

वसंताचे वडील दादासाहेब हे अर्बन को–ऑपरेटिव्ह बँकेंत लोकनियुक्त चेअरमन होते. त्याचवेळीं रावबहादुरही मुख्य सेक्रेटरीचें ऑनररी काम पाहात होते. याच अवधींत रावबहादुरांनीं अकाउन्टन्टला मसलतींत घेऊन त्याच्या सहाय्यानें कांहीं अफरातफर केली. आणि अखेरीस एका मिटिंगमध्यें आतां तें उघडकीस येणार हें जेव्हां नक्की कळून आलं, तेव्हां त्यांनीं मोठ्या शिताफीनें आपल्या अंगावरील तें पांघरूण दादासाहेब वेलिणे यांच्या अंगावर पसरून स्वत: नामानिराळे झाले. अर्थात याही वेळीं त्यांनीं बँकेंतल्या अकाउन्टन्टला मदतीला घेतलेंच होतें. दादासाहेब वलिणे यांचा स्वभाव बराच ताठ्याचा असे. त्यांना वरचेवर रावबहादुरांच्या घरीं खेटे घालणें आवडत नसे. तसेंच लोकलबोर्डमध्यें ते निवडून आले होते तरी रावबहादुरांच्या पक्षाचे ते नव्हते. लोकलबोर्डची मीटिंग असली म्हणजे रावबहादुर प्रणयपूराहून लोकलबोर्ड कचेरींत येऊन दाखल होत असत. पण दादासाहेब कधीं त्यांच्या भेटीला स्वतंत्रपणें जात नसत. रावबहादुर लोकलबोर्डचे प्रेसिडेन्ट होते. प्रेसिडेन्टची निवडणूक होण्यापूर्वीं रावबहादुरांनीं दादासाहेबांना आपल्या प्रणयपुराहून जवळच असलेल्या फार्डी नांवाच्या खेडेगांवांतल्या भव्य वाड्यांत पांच दिवस-

पर्यंत ठेवलें होतें. त्यावेळीं त्यांची व्यवस्था अत्युत्तम होती. मात्र वाड्याच्या बाहेर पडायला त्यांना परवानगी नव्हती.

निवडणुकीच्या वेळीं असे व्यवहार नेहमीं होतात हें आपण पाहातोच ! त्यांतलाच हा प्रकार ! आपल्या विरुद्ध पक्षाचा जोर कमी व्हावा हाच यांतला हेतु असतो.

अखेर निवडणुकीच्या दिवशीं कोंडलेल्या सगळ्या सभासदांना बजावून-ताकीद-देऊन मग मोटारींतून निवडणुकीच्या स्थळीं आणून हजर करीत. आणि आपला हेतु साध्य करून घेत व निवडणूक जिंकीत.

पण इतकं झालं तरी दादासाहेब वेलिणे यांनीं मात्र रावबहादुरांना मत दिलेंच नाहीं. रावबहादुर निवडून आले ही गोष्ट निराळी. पण दादासाहेबांचें मत मात्र त्यांना पडलें नाहीं हें खरें ! तेव्हांपासून रावबहादुरांचा रोष दादासाहेबांवर फार असे. अर्थात्च बँकेंतली ही अफरातफर आपल्या अंगावर आतां शेकणार असं दिसतांक्षणींच त्यांनीं हा डाव रचला—ही झब्बूशाही केली.

इतका बिकट प्रसंग आल्यानंतर साहजिकच दादासाहेबांना अकाउन्टन्टच्या घरीं खेटे घालणें जरुरीचे होते. पण अकाउन्टन्ट किती झालं तरी मुरब्बी—मुरलेला आंबाच तो ! शिवाय रावबहादुरांचा कच्छपि ! तो थोडाच दाद देतो यांनां ? मग रावबहादुरांच्या घरीं नाक मुठींत धरून खेटे घालणें त्यांना भागच होतें. अफरातफर कांहीं लहानसहान रकमेची नव्हती, कीं तेवढी झटकन् भरून मोकळे होतां आलें असतें !

झालेली अफरातफरीची रक्कम दादासाहेबांच्या आवाक्याबाहेरची होती. त्यांनीं सारा हिशेब स्वतः जातीनें तपासला. कीर्द खतावण्या तपासल्या, पण बॅलन्सशीटमध्यें कांहीं मेळ बसेना. मुरलेला अकाउन्टन्टच तो; त्याला हिशेब फिरवून लिहिण्याला कां कठीण पडणार ?

दादासाहेबांचे रावबहादुरांकडे जसजसे खेटे वाढूं लागले तसतसे रावबहादुर हरबऱ्याच्या झाडावर चढूं लागले. अखेरीस त्यांची निर्लज्जता इतक्या परमावधीला गेली, कीं त्यांनीं स्पष्टपणें 'तुमची मुलगी—शालिनी—हिचं माझ्याशीं लग्न लावून द्या' असं त्यांनीं सांगितलं नव्हे, अटच घातली त्यांनीं ती !

पिकल्या केसाला अब्रूची काळोखी लागायची वेळ आलेली. काय करतो म्हातारा न कबूल करून ! प्रश्न मोठा बिकट होता हें खरें, पण तो सोडविल्याशिवाय कसें चालायचें ? मुलीला विचारून पाहातों अन् नक्की काय तें सांगतो असें त्यांनीं कोरडे आश्वासन देऊन पाहिलें. पण 'मुलगी पाहिजे, कां मुक्तता पाहिजे ?' असा रोकडा सवाल विचारून रावबहादुरांनीं जेव्हां मुलीचा मोहरा पुढें करून शह लावला तेव्हां म्हाताऱ्यास नाइलाजानें तयार व्हावें लागलें. बुद्धीबळाच्या खेळांत कुणाचाही शह मागच्या एकाद्या मोहऱ्याच्या जोरावर लावला; कीं राजाला नाइलाजानें जागा सोडणें भाग पडते. आणि त्यांतही असा एकादा प्रसंग येतो कीं प्रतिस्पर्धी सांगेल त्याच घरांत राजाला ठेवणें भाग पडते. दुसरें आजूबाजूचें घर रिकामेंच नसतें त्यावेळीं. अगदीं मातच होत. तशीच हुबेहुब स्थिती यावेळीं झाली होती. रावबहादुरांनीं दादासाहेबांवर मात केली होती.

हीच गोष्ट वसंताच्या मनाला डाचत होती. आयताच प्रसंग चालून आला, तेव्हां त्याचा फायदा घेण्यासाठीं तो तत्पर झाला.

प्रथम कांहीं औपचारिक इकडल्या तिकडल्या गप्पा झाल्यानंतर वसंतानें संधी साधून त्यांच्या बरगडींत खंजीर खुपसला. त्यांना ओरडायलासुद्धां वाव ठेवला नाहीं. आणि पुढलें स्टेशन येतांच तो प्लॅटफॉर्मच्या मागील बाजूनें उतरला. व एका अगदींच गर्दी नसलेल्या पण लहानशा डब्यांत चढून वरच्या–सामान ठेवण्यासाठीं केलेल्या जागेंत जाऊन त्यानें झोंप ताणली. जवळचें सेकंड क्लासचें तिकिट त्यानें फाडून फेंकूनही दिलें होतें. दौंडवर गाडी थांबतांच त्यानें लागलीच गाडी बदलली व दौंड स्टेशनहून तो निसटला. ही गाडी गेल्यानंतर स्टेशनमास्तरांच्या नजरेला तो प्रकार आला.

पोलिसांना प्रथम हिमांशूचाच संशय आला, कारण खंजीरावर हिमांशु हें नांव होतें. पण प्रत्यक्ष चौकशी करतां हिमांशु परगांवीं गेलाच नाहीं असें खात्रीपूर्वक कळल्यावरून त्यांनीं आणखी शोध चालूं ठेवला. खंजीराच्या मुठीवरील बोटाचे ठसे दुर्बिणी-खालून तपासले. शिवाय वसंतानें फाडून फेंकून दिलेलें सेंकडक्लासचें तिकीट त्यांना सांपडलें होतें. त्यावरही वसंताच्या आंगठ्याचा ठसा उमटला होता. पण तो ठशाचा इसम हुडकून काढण्याला अवधी लागणारच.

इकडे हिमांशूचा हातरुमाल पोलिसांनीं ताब्यांत घेतला. व खुनी इसमानें कुठून गोळ्या झाडल्या असाव्यात याचा अंदाज

जखमेवरून करून त्यांनीं चिंचेखालची सारी जागा दुर्बिणीनें न्याहा-ळून काढली. आणि अशा रीतीनें तपासतां तपासतां खुनी कोणी-कडे पळून गेला हें ओळखून ते त्या रस्त्याला आले; पुढें जणूं, एकाद्याचा पाय घसरून मनुष्य पडला म्हणजे त्या जागीं जशी फरफटल्याची खूण दिसते तशी खूण दिसली. हिमांशूच्या पायांतील वहाण हिमांशूनें फेकून दिल्याची ही खूण होय! पुढें त्यांना एकाच पायांतल्या वहाणेचा छाप दिसला व दुसऱ्या पायाचा छाप अनवाणी पडलेला दिसला तेव्हां त्यांनीं आरोपीनें पायतण फेंकून दिल्याचा तर्क केला. आणि शोध करतां एक पायतण गटारांत सांपडलें.

हिमांशूला वाटलें गटारांत पाणी असेल, आणि पाण्या-बरोबर तें वाहात जाईल; पण गटारांत पाणी नव्हतें. पोलिसांनीं ती तुटकी वहाण ताब्यांत घेतली आणि आणखी शोध चालवला. थोड्याच अंतरावर दुसऱ्याही पायाचा छाप अनवाणी दिसला तेव्हां तेथेंही शोध करून त्यांनीं त्या केराच्या टोपलींतून ती दुसरी वहाण काढली. आणि नंतर पुढें डांबरी रस्ता लाग-ल्यानें पावलांचे छाप अस्पष्ट होत होत अगदींच दिसेनासे झाले.

हिमांशूनें खोलीवर पळत येतांना उलटी चक्कर मुद्दाम मारली होती. हेतु हा, कीं आपल्या मागावरून पोलिसांना खोलीकडे इसम पळून आला असेल हें कळूं नये. म्हणजे वस्तुतः त्याची खोली त्या चिंचेच्या झाडाच्या पश्चिम दिशेच्या रस्त्यावरून गेलं असतां लागण्यासारखी होती. पण यानें पूर्वेच्या रस्त्यावरून पळ काढून

दक्षिणेकडून डांबरी रस्त्यावरील आडव्या वळणानें परत येऊन खोली गाठली होती.

त्या वहाणेवरून वहाणेचा मालक कोण असावा याचा शोध पोलिसांनीं लावण्यास आरंभ केला. तोंच त्यांना हिमांशूनें आपल्या आईला, जें पत्र लिहिलें होतें, त्या पत्राचें फाडलेले तुकडे सांपडले व मग त्यांनीं हिमांशूस अटक करण्याचें नक्की केलें.

त्या पत्रांतील मजकुरावरून रावबहादुरांचा खून हिमांशूच्याच सल्ल्यावरून दुसऱ्या कोणातरी केला असावा हें सिद्ध होण्यासारखें होतें. आणि झालेंही !

त्या तिकिटांवर उठलेल्या आंगठ्याच्या ठशावरून, खंजिराच्या मुठीवर उठलेल्या तळव्याच्या ठशावरून आणि हिमांशूचा स्नेही आहे हें पाहून पोलिसांनीं वसंतालाही अटक केली.

हिमांशूला नक्की कळलें होतें, कीं बहुधा पोलिसांना आपला सुगावा लागला असावा. आणि हेंच सांगून सावध करण्यासाठीं तो मुंबईत वसंताकडे आला होता.

त्या दिवशीं दुपारीं वसंता गिरणींत गेला नाहींच ! हिमांशूशींच बोलत बसला. त्यावेळीं दोघांनींही पळून जाण्याचा भ्याडपणा करायचा नाहीं, सांपडलाच सुगावा तर निर्भयतेनें पोलिसांच्या स्वाधीन व्हायचं अन् तितक्याच निर्भयतेनें आरोप कबूल करायचा असं ठरविलं. मात्र आरोप कां केला आणि केलेला आरोप एकमेकांच्या सल्यानें केला हें कदापिही कबूल करायचें नाहीं असें ठरविलें. कारण एका आरोपाबरोबर—' कट केल्याचा प्रयत्न '—हा दुसराही लादला जाण्याचा संभव होता.



# १६ मी तुमचीच

'आपलं मरण आपल्याला दिसतें–' अशी एक म्हण आहे. खरी आहे ती. वसंताला आपण आतां बहुधा उद्यांच पकडलें जाणार हें कळलें होतें. तरी पण तो खंबीर मनाचा असल्यानें डगमगला नाहीं. पहिल्यानेंच सरकारचा हा विचित्र पाहुणचार घ्यायचा असल्यानें त्याचें मन थोडेसें विचलित झालें होतें ही गोष्ट खरी; पण तें तेवढ्यापुरतेंच !

रात्रीं त्याला बराच वेळ झोंप आली नाहीं. तो विचार करीत होता. त्याच्या मनश्चक्षूंसमोर भावी आयुष्यांतील प्रसंग उभे राहिले. शेजारी निर्मला आहे हें तो विसरला. त्याच्या तोंडून त्याला स्वतःला नकळतपणें 'रावबहादुर,' 'खून,' 'शिक्षा' असे उद्गार निघाले.

निर्मला पुस्तक वाचीत होती. आज दोनतीन दिवसांपासून—विशेषत:, हिमांशु आल्यापासून वसंताची चित्तवृत्ती पूर्णपणें बदलली आहे हें निर्मला जाणून होती. कांहीं तरी विशेष झालं असलं पाहिजे हें तिनें जाणलें. पण प्रत्यक्ष तिनें याबाबत मुळींच विचारलें नाहीं. वसंतच आपणहोऊन केव्हां तरी आपल्याला सांगेल याची तिला खात्री होती. पण आतां प्रत्यक्षच तिनें त्याच्या भ्रांतिष्ठावस्थेंत त्याच्या तोंडून निघालेले ते चमत्कारिक उद्गार ऐकले, तेव्हां ती घाबरली. भीतिदायकच असं कांहीं तरी चमत्कारिक घडून आलं आहे हें तिनें जाणलें. आणि तसं ती विचारणार, इतक्यांत वसंतानें तिच्याकडे मान फिरवली.

इतके दिवस दडवून ठेवणें रास्तच होतें; पण आतां अगदीं गळ्याशीं आल्यावरही दडवून ठेवणं रास्त नव्हे असा विचार करून निर्मलेला सारं कांहीं खुलेपणानं सांगायचं असा त्यानें निश्चय केला. आणि तेवढ्यासाठीं त्यानें तिच्याकडे मान फिरवली. त्याचे ओठ थरथरले, त्याला बोलावसं वाटत होतं, पण जें बोलायचं होतं तें आंतल्या-आंतच जिरलं. त्याच्या तोंडून शब्दच फुटेना. या अवस्थेंत कांहीं क्षण गेले. नंतर तो बोलूं लागला—

“ निमा, मी खुनी आहे. रावबहादूर प्रणयपूरकर यांचा मी खून केला आहे. इतके दिवस पोलिस खुनी इसमाच्या शोधांत होते, परंतु त्यांना नक्की पत्ता लागला नव्हता. आतां तो लागला असून त्याची सत्यता ते पडताळून पाहात आहेत. बहुतेक ते आज किंवा उद्यां वॉरंट काढतील आणि मला घेऊन जातील. ”

त्याचे हे उद्गार ऐकून प्रथम क्षणीं निर्मला फारच भेदरली. तिला विश्वासच वाटेना. आपला वसंत आणि खून करील? छे, अशक्य! असंच तिला वाटलं. पण नंतर ज्याअर्थी प्रत्यक्ष वसंतच आपल्या तोंडून सांगतो आहे त्याअर्थी ही गोष्ट खरी असली पाहिजे, असं तिला वाटलं.

स्त्रीच ती! भ्याडपणाचे विचार तिच्या मस्तकांत घोळायचेच! ती लागलीच त्याला म्हणाली.—“मग तुला जर हें कळलं, तर तूं पळून कां जात नाहींस! चल, फरारी होऊं या!”

“छे—छे! पळून जाणं भ्याडपणाचं आहे. जोंपर्यंत माहीत नव्हतं कुणाला तोंपर्यंत याची वाच्यता आपणही कुठें करायची नाहीं असं मी ठरविलं होतं. आणि एकदां कळल्यानंतर आपण दडविण्याचा किंवा फसवाफसवीचा प्रयत्न करणार नाहीं हें निश्चित! फार तर पकडतील, शिक्षा करतील—काळे पाण्यावर धाडतील अगर फासावर लटकवतील! आनंदानें ती शिक्षा सहन करीन. जें केलं तें भोगलंच पाहिजे. आज पळून गेलों म्हणून उद्यां सांपडणार नाहीं असं थोडंच आहे? सरकारचे ‘सी. आय. डी.’ खात्यांतले नोकर आपल्यापेक्षांही जास्त हुषार असतात! ते आपल्याला पकडल्याशिवाय कां राहतील? मग एवढी आटाआट करा कशाला? जें उद्यां व्हायचं तें आजच होईल एवढंच ना! होईल तर होईल! त्यांत भ्यायचं कां म्हणून? पण वाईट वाटतं तें एवढ्याचसाठीं, कीं मी तुझ्या सहवासाला अंतरणार. तूं आपल्या मनाशीं माझ्याविषयीं धरलेल्या आकांक्षांचं मरण आतां अल्पावधींत तुलाच पाहायला मिळणार! आपल्याच आशांचं, आकांक्षांचं मरण आपल्यालाच पाहायला मिळणार यांत जें दुःख असतं तें इतरत्र कशांत

असेल असं मला वाटत नाहीं. निमा, क्षमा कर मला. मी तुझी वंचना केली. तुझा मी सहस्रपटींनीं अपराधी आहे." बोलतां बोलतां त्याचा कंठ दाटून आला. आवाजांत कंप उत्पन्न झाला. डोळ्यांच्या पापण्याही ओलसर झाल्या.

त्या रात्रीं झोंप कसची? वसंत आणि निर्मला दोघेही जागेच होते. दोघांच्यापुढें उद्यांचीं भेसूर दृश्यें—दिसूं लागलीं. दोघांचेही चेहरे उदास झाले होते. ते दोघेही एकमेकांकडे टकमकां पाहात होते.

रात्रीं दीडचा सुमार होता. वसंताच्या मनांत काय आलं कोण जाणे, तो उठला—,'वर गच्चीवर जाउं या येतेस कां?' निर्मले-कडे पाहात म्हणाला. निर्मलाही कांहीं न बोलतां उठली. आणि त्याच्याबरोबर गच्चीवर गेली.

अमावास्येची रात्र होती. सर्वत्र काळाकुट्ट अंधार होता. आकाशांत चांदण्यांचें जाळें विणलें होतें. निळ्या तलम पातळावर चमकदार शुभ्र रंगाची खडी काढली आहे असं आकाशाकडे पाहिल्यावर वाटे. दूरवर दिसणाऱ्या समुद्रकिनाऱ्यावरील बंगल्यांतून चमकणारे दिवे, जणूं आकाशांतल्या तारकाच पृथ्वीवर उतरल्या आहेत असें दिसत होतें.

ती त्यांच्या आयुष्यांतली मीलनाची बहुधा शेवटची रात्र होती. आतां त्यानंतर भेट होणें बहुधा शक्यच नव्हतें. होणारच असेल, तर तुरुंगाच्या दारांत अगर फासांवर लटकण्यापूर्वींच भेट होणार हें ठरलेलें होतें.

" निमा, माझ्यावर प्रेम करण्यानें तूं आपल्या आयुष्याची स्वहस्तानें होळी पेटवीत आहेस. तुझा हा उग्र त्याग पाहून तुझ्या

विषयींचा माझा आदर दुणावतो आहे. मी सर्वस्वीं दिपून गेलों आहे तुझ्यापुढें. निमा, तुझ्या प्रेमांत अमृत आहे. पण तुझ्या प्रेमामृताचा आस्वाद घेण्याचें या अभाग्याच्या नशीबीं नाहीं. तुझं प्रेम निरपेक्ष आहे. अंगावरून हात फिरवलास, प्रेमळपणानें चेहऱ्याकडे टक लावून पाहिलंस, कुरवाळलंस म्हणजे स्वर्गसुखाचा अनुभव घेत आहें असा अनुपमेय आनंद वाटतो मनाला. निमा, भावनाविवशतेनें पण हेतुपुरस्सर मी हा खून केला. भावना–मग ती कुठलीही असो, कशाही प्रकारची असो; अंतर्यामांत रुतणाऱ्या कांट्यासारखी सलते ती एकसारखी. कांटा रुतल्यानंतर तो सारखा सलत रहात नाहीं कां ? तसंच आहे भावनांचं स्वरूप ! कांटा काढल्याशिवाय बरं वाटत नाहीं, चैन पडत नाहीं; आणि न काढावा तरी बरं वाटत नाहीं. कारण तो आंतल्या आंत जास्तच सळसळत असतो. भावनासुद्धां अशाच स्वरूपाच्या असतात. त्यांच्या पूर्ततेसाठीं खटपट न करावी, तर जिवाला चैन पडत नाहीं आणि पूर्ततेसाठीं खटपट केल्याशिवाय राहवत नाहीं. तप्त तेलाचा चटका दिल्याशिवाय खोल रुतून बसलेला कांटा जागा सोडीत नाहीं म्हणतात. तद्वतच भावनांच्या पूर्ततेसाठीं असाच कांहींसा चटका जिवाला —हृदयाला—देणें जरूर आहे. मी रावबहादुरांचा खून केला. त्यांचा खून करण्यांत मी गैर कृत्य मुळींच केलं नाहीं. समाजाला गिळणाऱ्यांचा नायनाट आजच्या तरुणांनीं केलाच पाहिजे. निमा, आतां पुन्हां आपली भेट होणं अशक्य आहे. तुझं माझ्यावर आणि माझं तुझ्यावर प्रेम आहे. या प्रेमाची पुन्हां वाच्यता करणं मूर्खपणाचं आहे. मी कामुकवृत्तीचा नाहीं. पण निमा, आपल्या प्रेमाचा पूर्ण उपभोग आपल्या

दोघांनाहीं घ्यायला मिळाला नाहीं, ही टोंचणी जिवाला टोचते आहे सारखी. निमा, मला कांहीं नको, आज फक्त तुझं चुंबन मला घेऊं दे. तुझ्या गालांवर मला माझे ओंठ ठेवूं दे. त्यांतच–त्या तुझ्या चुंबनांतच माझ्या हृद्यांतील आग–तळमळ–शमणार आहे. माझी तशी खात्री आहे." असं म्हणून त्यानें निर्मलेच्या हनुवटी-वर हात ठेवला. तिच्या चेहऱ्याकडे त्यानें कांहीं क्षण निरखून पाहिलें. आणि नंतर त्यानें तिचें चुबन न घेतांच तिची हनुवटी सोडली.

"नाहीं निमा! मी चूक करतो आहे. तुझं चुंबन घेण्यांत माझी चूक आहे. तो माझा अधिकार नाहीं. यापूर्वीं होता, पण आतां नाहीं. निमा, मी तुझ्या आयुष्याची होळी काय म्हणून पेटवूं? टवटवायला लागली आहे तोंच तिला जाळून टाकूं काय? निमा, तुझी सुकुमार काया या अभाग्यासाठीं झिजवूं नकोस. जा, दूर जा माझ्यापासून. अजून तुला आपल्या आयुष्याचा फुलोरा फुलवितां येईल. दुसऱ्या कुणा महाभागाला तूं आपलं प्रेम अर्पण कर—"

तो आणखी पुढें कांहीं तरी बोलणार होता, पण तितक्यांत निर्मलेनें त्याला बोलूं दिलें नाहीं.

"नाहीं! वसंत असं भलतचं बोलूं नका. मी तुमचीच आहे. आणि तुमचीच राहाणार!" असें म्हणून ती त्याच्या कुशींत शिरली. निर्मलेचे प्रेम उदात्त होतें, म्हणूनच तें अशाही स्थितींत अढळ राहिलें. निर्मलेच्या उदात्त प्रेमाचें वर्णन करावें तितकें थोडेंच आहे! परंतु 'उदात्त प्रेम' हें ज्याच्या आयुष्यांत मृगजळ ठरलं, त्या प्रेमाला आंचवलेल्या प्रेमवंचकाला निर्मलेच्या उदात्त प्रेमाचें वर्णन यापेक्षां जास्त सरसतेनें अननुभवामुळें करतां येणें अशक्य आहे.



# १७ शेवट

**निर्मलेच्या डायरीचीं पानें—**

"...वसंताची ही दशा झाली. सर्वांचा आग्रह 'आतां मी दुसऱ्या कुणाशीं लग्न करून घ्यावं' पण त्यांना माझ्या हृदयाची—माझ्या भावनांची—काय कल्पना असणार ! प्रेम हें असं नसतंच कधीं. या वयांत जडलेलं आणि केलेलं प्रेम हें अभंग–अभेद्य असतं. प्रेम हें एकदां आणि एकावरंच केलं जातं. दुसऱ्या वेळीं पुन्हां प्रेम जडणं आणि तेंही दुसऱ्या व्यक्तीवर प्रेम जडणं शक्य नसतं. मातृप्रेम, बंधुप्रेम, पितृप्रेम, वत्सलप्रेम–प्रेमाच्या अनेक तऱ्हा आहेत, अनेक प्रकारचं प्रेम आहे. पण हें प्रेम मात्र अभंग अभेद्य स्वरूपाचें असतें. तसेंच तें शुद्ध, निरपेक्ष, निर्मळ, स्वार्थानपेक्ष व हेतु-

शून्यही असते. त्यांत वैषयिकता नसतें असें नाहीं. ती असणा-रच ! किंबहुना वैषयिकता नसेल, तर तेंही खरें प्रेम म्हणतां येणार नाहीं. हलक्या धातूच्या मिश्रणाविना शुद्ध रुप्याचं नाणंही खण-खण वाजत नाहीं. मग प्रेम तरी निव्वळ सत्वगुणाचें कसें असूं शकेल ? वैषयिक प्रेम हें हलक्या धातूसारखें आहे. त्यांची भेळ शुद्ध निरपेक्ष प्रेमांत व्हायचीच ! त्यांत गैर असं कांहीं नाहीं."

* * * *

"माझा वसंत गेला ! या अन्यायी जगाला विटलेला वसंत हा इहलोक सोडून गेला. प्रेमांत सुधेची मधुरता, मदिरेची मादकता आणि हालाहलाची दाहकता सांठलेली असते म्हणे ! एवढं मात्रं खरं, कीं प्रेमांत हालहालाची दाहकता आहे ! वियोग ! असह्य झाला हा वियोग ! वसंत, वसंत—

हाय ! आतां कुठें आहे वसंत ? फासांवर केव्हांच लटकला गेला तो ! वसंत, माझ्या हृदयांत प्रेमाचा किरण फेंकलास आणि अखेर अशी होळी पेटवून निघून गेलास ? वसंत, मी तुझी ना, तूं माझा ना ! मग, मला टाकून कां रे गेलास ? नाहीं; मी येणार, धांवत येणार तुझ्याकडे—जगांत जगायचं कशासाठीं ? प्रेमासाठीं ! मग, **माझं प्रेम परमेश्वरस्वरूप झालं, तर आतां मलाही नको कां परमेश्वरस्वरूप व्हायला ? मीही जाणार ! परमेश्वर-स्वरूप होणार !**

वसंता, माझं चुंबन घेण्याची तुझी इच्छा अपुरी राहिली आहे. ती तुझी अपुरी इच्छा पुरी करायला ही पहा मी तुझ्या मागोमाग आलें.

वसंत ! वसंत !! वसऽऽऽन्त !!!

---